






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







# हाराष्ट्र साहित्य पत्रिका

वारी ते मार्च २०१४ अंक क्र. ३४७





लाघवी गुप्तचरा! महाभ्रमणाच्या महाप्रभा-
होय सोयरा आमचा!
सोयऱ्या,
तुझे जगणे मरणे असू दे आमच्यासाठी.
असे घडायचेच नसेल जर यापुढे-
तर आम्हासही नाही तुझे सोयरसुतक.
हे महाकोडग्या!
मी मारतो तुझ्या रथाचे सात घोडे;
आणि मोडतो तुझ्या रथाचे चाक.

(नामदेव ढसाळ)

प्रकाशक - मलीका अमर शेख, डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रबोधिनी, मुंबई ११ यांच्या सौजन्याने.





# महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या जडणघडणीतील पुराणपुरुष

**म. श्री. दीक्षित**

जन्म : १६ मे १९२४ ते देहावसान : १६ फेब्रुवारी २०१४

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

अंक क्र. ३४७, जानेवारी ते मार्च २०१४

संपादक

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**



प्रकाशक

**प्रकाशक पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०

दूरभाष ०२०-२४४७५९६३

(कार्यालयाची वेळ : सकाळी ९.३० ते ११.३० दुपारी ४.३० ते ७.३०)

अनुक्रमणिका







# अनुक्रमणिका



---

मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**स्मिता टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

कव्हर पेजवरील काव्य रेखाचित्रे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रवोधिनी प्रकाशित कवी नामदेश ढसाळांच्या '॥ मी मारले सूर्याच्या रथाचे सात घोडे ॥' ह्या कविता संग्रहातील अरुण कालवणकर, नामदेव ढसाळ, प्रदीप दारोळे, श्रीनिवास देवधर यांची आहेत.
मुखपृष्ठ सजावटकार : **श्री. हेमंत सरदेसाई**
भ्रमणभाष : ९३२६०७०९३४

**किंमत : १५/- रुपये**

प्रकाशन : मार्च, २०१४

संपादकीय

# काळोखाची काव्यचर्चा!

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

कवी नामदेव ढसाळांनी आजपर्यंतच्या रसचर्चेला एक युगप्रवर्तक विचार देऊन अवघ्या सौंदर्यचर्चेसमोर एक आव्हान उभे केले. भरतादिकांच्या रसचर्चा पाहता नामदेव ढसाळांच्या कवितेतून प्रत्ययाला येणारी प्रतिक्रियात्मक रसचर्चा म्हणजे मराठी साहित्यात उघडले गेलेले एक नवे दालन होय. सौंदर्याचा शोध घेत घेत आनंदाचा बोध आणि अनुभव घेणे ही कवितेची वाटचाल आणि रसचर्चा नामदेव ढसाळांनी मुळापासूनच अव्हेरली! 'रस हे साऱ्या काव्याचे मूळ आहे; आणि रसावाचून काव्य समजू शकत नाही. रस हा काव्याचा शरीरघटक आहे. हे खूप झाले! पण काव्यरसाने माणसाला आनंद का व्हावा? प्रतिभेच्या चांदण्यात सर्व वस्तू सुंदर दिसतात. त्याने एका अनिर्वचनीय आनंदाचा लाभ होतो; आणि तो ब्रह्मास्वादसहोदर आहे इ. आनंदानुभवांच्या संकल्पना आणि त्यासंबंधीचा 'शुक्तीरजत' सिद्धान्त – यालाच नामदेव ढसाळांच्या कवितेने आव्हान दिले आहे. शुक्ती आणि रजत (शिंपले आणि चांदणे) हा काव्ययोगच एक भ्रामक प्रतिमा आहे. पौर्णिमेच्या चांदण्यात वाळूतली शिंपली चंदेरी दिसणे, नव्हे... नव्हे... सर्व वस्तुमात्र चंदेरी दिसणे, हाच भ्रम आहे. भर उन्हात वाळूचे चटके बसू लागले म्हणजे तो भ्रम होता. हे समजते. सगळेच उफराटे! तेथूनच मग नव्या उलथापालथीला सुरुवात होते. चांदण्यातली मूळ चांदी ही वस्तू तर तिजोरीत! मग? आम्ही विशुद्ध संवेदनेच्या मागे! अर्थमुक्त संवेदना. विशुद्ध संवेदनेची लयबद्ध रचना– संवादी, विरोधी आणि समतोलाची सर्कस! कान्ट, रसेल आणि रिचर्डस् हे रिंगमास्टर आणि काव्यशरीर-शास्त्राचे सर्जन! कलेतील संवेदना समुच्चयाचे, त्यातील अर्थासंबंधीचे भाग पाडून विच्छेदन करून रंगविभ्रमाच्या लय आणि तालाच्या चर्चेचे ऑपरेशन करून सौंदर्यभाव शोधणारे! पण इकडे काळाच्या कासवगतीने चालणाऱ्या मागेपुढे होणाऱ्या डोक्याच्या लयीत हे फुलपाखरू भुकेने गिळले! (रंगविभ्रमाची गोष्ट) नामदेव ढसाळ म्हणतात, 'माझ्यात एका विध्वंसाची सुरुवात झाली आहे

*कसला 'झपूर्झा' आणि कसलं काय?*
*खाली डोकं वर पाय'*

विश्वाचे असे भ्रममूलक रहस्य पाहून मरून गेली होती माझी कविता करण्याची इच्छा!

वस्तूच्या वस्तुरूपापासून दूर कुठेतरी अवास्तवाच्या जगात जायचे. चांदीचे चांदणे करायचे. 'तेथे चल राणी...!' जेथे अन्याय, दारिद्र्य, बेइमानी नसेल अशा जगात जाऊ. जेथे फक्त प्रेमच असेल. अशा भ्रामक जगात, उपमान आणि उपमेयाच्या विसंगत जगात – एका भ्रामक विश्वात रमणारी आणि त्याच 'झपूर्झा'त उन्मनी होणारी काव्यसृष्टी म्हणजे एक वास्तवाला फसवणारी 'कोलांटउडी' आहे. खाली डोके वर पाय...! डोक्याने मेंदूने सर्व अवयवांना विचारशक्तीने नियंत्रित करायचे. तर त्याऐवजी वास्तवापासून दूर कुठेतरी 'उन्मनी' अवस्थेत जायचे. हा सगळा फसवा खेळ आहे! काव्यवस्तू ही 'भावत' असते. भाव किंवा रस शब्दात नसतो, कवीत असतो. म्हणूनच एक शब्द सर्वांना सारखा अर्थ देत नाही. सौंदर्य आणि आनंद याचे नाते कवीच्या मूळ भावावर अवलंबून असते. म्हणूनच नारायण सुर्वेंना भाकरीच्या जागी 'सीतेचे मुख' दिसले नाही. जेथे 'भूक' हाच उद्दीपन भाव आहे; आणि 'क्षुधाशान्ती' हा अनुभाव आहे – संचारी भाव आहे – तेथे

कोणती रसनिष्पत्ती होणार? वाळवंटात मृगजळ पाहिले की, तहानलेला उद्दीपनभाव जेव्हा आवर्तात सापडतो; तेव्हा 'संचारी-भाव' किंवा अनुभाव कोणता प्रकट होईल? ह्याचे उत्तर भरत, भट्टलोल्लटादि यांनी दिले नाही! ते नामदेव ढसाळांनी प्रथम दिले आहे. मुळात ज्या काव्यशरीरावर अलंकारादी चढवून काव्यसौंदर्य वाढवायचे; ते तथाकथित शरीर सुंदरच आहे, असे आख्ख्या काव्यशास्त्राने मानले आहे. प्रामुख्याने माधुर्य-प्रसाद आणि दीप्ती एवढाच सौंदर्यशास्त्राचा परीघ आहे. रामायण-महाभारत आणि पुराणकथांच्या पलिकडे काव्यशरीर किंवा काव्यविषय नव्हता. नंतर कवितेत केशवसुत, मर्ढेकरांनीही क्रांती केली. तीही शब्दनिष्ठच होती लयतत्त्वाची.

कवितेवरील उपमान उपमेयाच्या रसचर्चेचा प्रभाव संपूर्णपणे बदलून एका वेगळ्याच शारीर जंगलात हरवलेला काव्यविषयाचा 'अनुभाव' नामदेव ढसाळांना जाणवला. अंधाराच्या कविता आकृतीबंधापासून मुक्त झाल्या. (Formlessness) परंतु कवितेचा कायदेभंग (lawlessness) आणि प्राचीन दर्शनकारांचा आणि विशुद्ध संवेदनेचा भ्रमनिरास नामदेव ढसाळांनी केला.

नाट्यकाव्यशास्त्राचा भावनाकल्पित विचार करताना 'इतिवृत्तं तु नाट्यस्य शरीरम् परिकीर्तितम्...' असे भरताने म्हटले आहे. 'इतिवृत्त' याचा अर्थ काव्यविषय म्हणजेच काव्यशरीर असे मानले आहे; आणि शब्द काव्यविषयाची अंगे-उपांगे आहेत. त्यातूनच शब्दालंकार आणि अर्थालंकार होतात; आणि लयबद्ध रसभाव निर्मिती होते. म्हणजेच तो रसभाव हा मानसिक पदार्थ आहे. मन आणि शरीर वेगळे नाही! म्हणून रसभाव नर्तनात मुद्रांमधून आणि काव्यात भाषेतून, शब्दांमधून प्रकट होतो. परंतु नामदेव ढसाळांनी ह्या काव्यशरीर ('इतिवृत्त') विषयापासूनच वेगळा सूर लावला आहे. माझे काव्यशरीर भरतलोल्लटकादींनी मानलेले सुंदर कुठे आहे?

*'माझे जग आहे शिसारीने भरलेलें*
*त्याला टाकून जाता येणार नाही मला पुढे...!*
*(नावडता क्षण)*

किंवा

*'ब्रह्म: माया: सान्त: अनंत सर्वच शब्दच्छल*
*भ्रम, स्वप्न, आत्मविसंगतीने भरलेले जग... (मी)*

तसेच

*'पुनरुत्थानाच्या कालखंडात ही माणसं जपत–*
*असतात– आजोबा, पणजोबा, खापरपणजोबांच्या*
*समाध्या.*
*वाहणाऱ्या काळ नदीच्या पाण्याकडे ही माणसं –*
*ढुंकूनही पाहत नाहीत... (आणखार वाटतं समद्याचं)*

आमचा काव्यविषयच ('इतिवृत्त'च) बीभत्सरसाने भरलेला आहे. घाण, हागनदरी, रोगराई, पावला-पावलाला कुणीतरी येऊन भाकरी छिनून घेईल याचे भय, विकृती, अभावग्रस्तता, अपशब्द, विरूप, व्यंग, व्यंग्य, विसंगती, भंगलेल्या स्वप्नांची ओझी वाहत आणि स्वत:ची भूमिका, स्वत:चे अस्तित्व हरवलेला मी, शोधतो आहे माझा मलाच! अपार कष्ट आणि यातना असलेल्या मार्गावर मी एका महानाट्याचा शोध घेत आहे. माणसाचे सोने करणाऱ्या 'महामानवाने' दाखविलेल्या वाटेने मी माझाच प्रश्न शोधायला निघालो आहे. हा असा प्रश्न आहे की, त्यातच त्याचे उत्तर आहे. हा असा काव्यविषय आहे, की जेथे उपमेय मी आहे; आणि उपमानाचा पत्ताच नाही. मी माझ्याच भोवऱ्यात! मग मी कविता, कवितेचा कायदा कसा पाळणार?

. नामदेव ढसाळ ह्या चकव्यांनी भरलेल्या वाटेवर चिंतनशील होतात–

*---बाप्पा अंतिम तरी काय असते शेवटी?*
*ज्याचा पाठलाग करत आलास आजवर तू*
*तो सत्य नावाचा लांडगा*
*सापेक्षतेच्या जंगलात दडून बसलाय अजून!*

त्या सत्याला शोधण्यासाठी वैदिक मंत्राची भाषा

अपुरी पडते. स्तुतीस्तोत्रे गाऊन ते सापडणार नाही. भूपाळी-भैरवीतील माधुर्याने आमचा 'सत्य सूर्य' अंधारात दडून बसला आहे. अंधार हाच आमचा इतिहास आहे. भूगोलही आहे. माधुर्य-प्रसाद-दीप्ती इ. पंचेंद्रियांच्या काव्यगुणांची वाट लागली आहे ह्या शिसारीने भरलेल्या वाटचालीत! रसराज शृंगाराचीही दुर्दशा झाली आहे देहविटंबनेने! येथल्या 'चिरकालीन शांततेच्या शांतरसाच्या अराजकाचे नाव आहे – मरण!' सर्वत्र मरणाचे अराजक! कित्येक पिढ्या ह्या अराजकातच वाढल्या आणि संपल्या! उजेडाअगोदरच्या अंधाराची 'ज्योतिर्गमय...'ची आशाच संपलेली!

*...बाप्पा उजेडा अगोदर अंधार आहे रहिवासी इथला*
*अंधार झाले सहावे इंद्रिय!*

इथे सूर्यही पक्षपाती झाला आहे.

सूर्य रोज नव्याने उगवतो. नवजीवन देतो! त्याला तमारि म्हणतात, प्रकाशाचा स्वामी म्हणतात. सर्व जगावर सारखाच प्रकाश देणारा, उषा संध्येचे रंग खेळून आभासाचे रंग दाखविणारा सूर्यही अंधार आला की आमच्या हातावर तुरी देऊन पळून जातो. तो जगाचा स्वामी सूर्य आमच्यासाठी केवळ एक जळणारा दगड! अलिप्त आणि संवेदनाहीन! जगाचा डोळा असलेल्याचा आमच्याकडे साधा कटाक्ष – एक किरणही नाही! ...'हे दगडाच्या महादगडा ...तुझ्या सौरसत्तेचा अंमल तोकडा...! तुझ्या उजेडाच्या मुकुटाने आमचे ब्रह्मांड काळवंडून गेले!

*आमच्या दारातील गायी-म्हशींचा*
*लिलाव पाहत राहणाऱ्या,*
*दारिद्र्याने बजबजलेला, आमचा हाडकी-हाडवळा,*
*आमची वस्ती आणि साथीचे रोग न्याहाळणाऱ्या,*
*आमच्या आयुष्यातील गू-घाण उकिरडे*
*माश्या आणि चिलटे वारता आली नाही तुला!*
*आमचे ऋतुचक्र उद्ध्वस्त करणाऱ्यांवर*
*कृपादृष्टी ठेवणाऱ्या–*
*परत कर आमची शेते आम्हाला!*
*रद्द करून टाक आमच्या जमिनींची झालेली*
*हस्तांतरे–*
*शिक्षा कर जातदांडग्या धनदांडग्या*
*जमीनदार सामंत आणि सरंजामदारांना!*
*परत कर आमचा पाऊस*
*आमच्या शेतांवर बरसणारा...*
*...संपवून टाक युगायुगांचा थकवा*
*...संपू दे आमच्या आयुष्यातील सहाराची वाळवंटे*
*...सगळे सगळे आमच्या आयुष्यातील दुष्ट संपू दे*

सर्वसाक्षी सूर्यदेवतेने ह्या प्रार्थनेकडे युगेनयुगे दुर्लक्ष केले आमच्या विच्छिन्न जीवनावर! मग हा कसला दयाघन आणणारा देव! हा असला-कसला अंधाराचे कालचक्र फिरविणारा विश्वाचा सूर्य. वेदांनी ह्याची तमारि, तिमिरारी, गभस्ती म्हणून त्याला उदात्त संवेदनेचा काव्यविषय बनविले. युगायुगांचे हे काव्यशरीर आमच्याच प्रदेशावर आपली जीवनदायी किरणे आखडून का घेत आहे? इथे त्याचा अंधारच तापलेला आहे. अंधाराच्या तप्त वाळूवर आम्ही तडफडणारे मासे! अरे चांडाळा सूर्यदेवा–

*...सुख शुभाची प्रतीक्षा करत-करत*
*टाचा घासत मेल्या आमच्या*
*कित्येक पिढ्या!*
*लाघवी गुप्तचरा, महाभ्रमणाच्या महाप्रभा–*
*होय सोयरा आमचा.*
*सोयऱ्या*
*तुझे जगणे-मरणे असू दे आमच्यासाठी.*
*असे घडायचेच नसेल जर यापुढे–*
*तर आम्हासही नाही सोयरसुतक.*
*हे महाकोडग्या!*
*मी मारतो तुझ्या रथाचे सात घोडे*
*आणि मोडतो तुझ्या रथाचे चाक.*
*(।। मी मारले सूर्याच्या रथाचे सात घोडे ।।)*

संवत्सरे, महासंवत्सरे तसेच सत्य : त्रेता : द्वापार : कलि – अशा युगामागून युगे, हे कालचक्र

ह्या पक्षपाती सूर्याच्या हातचा कठपुतळ्यांचा खेळ खेळत आहे. त्याच्या कालचक्राचा आखच मोडला पाहिजे. त्याच्या सातवारांचे सात घोडे मारून हे रथचक्र थांबवले पाहिजे. हे 'दैववशात बेभरवशाचे जगणे' नको आहे. कलियुगातलं आमच्या संवेदनांच्या 'अस्तित्वाच तान्हुलं' नाकारणाऱ्या सूर्याच्या पक्षपाती कालचक्राच्या रथाच्या सात घोड्यांना मारूनच ही कालगती 'देहाच्या ऊर्जेने' तोलून धरली. पंचमहाभूतांना मी जाणून घेतले आहे. विज्ञानाच्या दृष्टीने मी नुसता 'ज्ञानमय' नाही, 'विज्ञानमय' झालो. मीच ब्रह्मा-विष्णू-महेश-रुद्र-अग्नी-वायू आणि मीच सूर्य आणि चंद्र झालो! हाच माझ्या ओळखीचा क्षण मला लाभला! 'झोळी'तून भुकेचा निखारा वाहण्याचा! 'भासमान प्रतिमांचा हल्ला' अंगावर झेलताना आणि त्यांचा मारा चुकविताना मी एकाकी झालो. हाच माझ्या कवितेच्या मुक्ततेचा क्षण होता. तरीही तत्त्वज्ञानाच्या, अध्यात्म्याच्या, कर्मविपाकाच्या जंगलात, मी स्वतःचे अस्तित्व शोधताना मला प्रश्न पडला की, प्रत्येकजण त्याच संस्कृतीच्या जुनाट वटवृक्षाच्या आधाराखाली वारंवार का येतात? जेथे संस्कृतीच्या दरोडेखोरांनी मानवतेचे मुंडके छाटून लटकावून ठेवले आहे. हा युगायुगांचा चकवा आहे. क्षणकाल मलाही सुचेनासे होते. मग मीच मला ओरडून सांगतो–

*'नामदेवा,*
*कुठला हा वटवृक्ष या गच्च अंधारात आधार वाटावा?*
*नामदेवा, नका बघू वर–*
*कुण्या दरोडेखोराने कापले आहे कुण्या माणसाचे मुंडके!*
*लटकावून ठेवले आहे या वडाच्या फांदीला...!*
*नामदेवा, असे काय ढिम्म उभे–*
*झाडापासून दूर चला ना पुढे–*
*प्रत्येक पावसात पुन्हा याच झाडापाशी घेऊन येता!*
*नामदेवा, हा काय चकवा...*

हा आत्मविसंगतीचा चकवा. ब्रह्मः माया : सान्त आणि अनन्त!

शब्दच्छलाच्या चकव्याचे काव्यशास्त्र! शरीर-आत्म्याभोवतीच फिरणारे! संवेदनाहीन!

कवितेचे अमर अशरीरी प्रेम मात्र नामदेवांनी नाकारलेले नाही. त्यापासून वंचित झाल्याचे दुःख आहे. पण प्रश्न पडतो, अन्नाइतकेच तेही आवश्यक आहे का? ह्या यातनालयात खरे प्रेम, निसर्गसौंदर्य, फुलपाखरांचे रंग मोसमाबरोबर बदलणारा निसर्ग आणि ते दाखविणारा हा 'दयाघन देह'! यांच्यातल्या 'आयुष्याच्या कुतरओढीचे छान व्यंग्यचित्र' म्हणजेच नामदेवांची कविता! मनुष्यजातीच्या संस्कृतीच्या कायापालटाची इच्छा धरणारी! जगू इच्छिणारी!

कालचक्र बदलल्याची चाहूल नामदेवांनाही लागली आहे. याची देही याची डोळा! गेल्या पाच दशकांच्या अंधारयात्रेनंतर 'स्पृश्य अस्पृश्य

*नदीत वाहून गेलं – पाच दशकात*
*शिवताशिवतांचा विटाळ अविटाळांचा जाच*
*इतिहास भूतकाळ माझ्या पूर्वजांना छळणारा...*
*आता लाभला आहे निवांतपणा तुझ्यामुळे!*
*...आता शेतात, मळ्यात, कारखान्यात, ऑफिसात राबून*
*अस्पृश्य माणसं सन्मानाने मिरवताहेत आपले*
*अन्न-वस्त्र-पाणी-घरदार*
*'माझी आमची प्रतिसृष्टी निर्मिणारा...*
*आमच्यासाठीच नव्हे, तर अखंड मानवजातीसाठी*
*नवे जग रचणारा भीम माझा!*
*...शारदेच्या वीणा झंकाराच्या स्वरलहरीत नांदतो*
*भीम माझा...'*

हे सर्व खरे! पण त्यांचे लोकशाहीचे स्वप्न? ढसाळ म्हणतात–

*शोषितांची पिळवणूक थांबविणाऱ्या*
*त्याचे गणराज्य निर्मिणाऱ्या*
*चारही दिशातून दुःख, दारिद्र्य, अज्ञान, शोषण*
*सर्व सर्व ओलांडून माणसे येताहेत तुझ्या दिशेने.*

*...त्यांना न्याय मागायला निघालेल्या माझ्या बापा*
*मोर्च्यामागून मोर्चे चाललेयत विधिमंडळाच्या*
*दिशेने, संसदेच्या दिशेने!*
*मीही तुझे बोट धरून चाललो आहे मोर्च्यातून.*
*दुतर्फा पोलिसांचा ताफा*
*आपली दंडुकी आणि बंदुका सांभाळीत*
*मी चाललो आहे तुझ्यासोबत*
*हे चित्र तुला अभिप्रेत असलेल्या*
*लोकशाहीचेच ना?*

ह्या प्रश्नाची 'रसचर्चा' करण्याअगोदरच नामदेव ढसाळ भीमवासी झाले. आता तर ह्या 'पँथरची' कवितेला गरज होती. आता तर खरा रंग भरू लागला होता – महामानवाच्या रसचर्चेला! प्रिय नामदेवा! तुझ्या इतक्या निर्भयपणे, आता कोण करणार महामानवाच्या लोकशाहीच्या कवितेची रसचर्चा? माहिती आहे! तुम्हाला व्हायचे नव्हते 'वाल्मिकीची कार्बन कॉपी!' पण तुमच्या अशा विरहाचा चटका सहन होत नाही आम्हाला! महामानवाने मांडलेल्या समाजाच्या प्रपंचाच्या रगाड्यात तुम्ही स्वत:ला हरवलात! तुम्हाला जाणवले होते की माणसातला माणूस वारून बरेच दिवस झालेत. तरी तुमचे हे स्वगत?

*'...प्रपंचाच्या रगाड्याने केले मला पापाचे धनी–*
*बायकोला म्हणालो हे आपल्या संसारासाठी केले*
*घे यातले थोडेसे पाप वाटून–*
*तिने कानावर हात ठेवले!*
*मुलालाही हीच वाक्ये म्हणून दाखविली–*
*त्याने तर अंगाला पानही लावून घेतले नाही!*
*वाल्मिकीने पापाचे ओझे वाहत वाहत*
*अजरामर आर्षकाव्य तरी लिहिले; आणि मी?*
*...मी वाहून आणले जगण्याचे ओझे येथपर्यंत!*
*हे जगण्याच्या वास्तवा, तूच सांग*
*मी काय लिहू?'*

अहो! आता-आता तर तुम्ही लिहिता ते आम्हाला उमगू लागले होते. महाकवी नामदेवा! लोकशाहीचे अनिर्बंध अश्व दिशाहीन चौखूर उधळू लागले आहेत. त्या दावेदारांना रोखण्यासाठी तुमची निर्भय, नि:स्वार्थ, स्वतंत्र लेखणीच हवी होती आम्हाला! हे आव्हान – आणि ह्या काळोखाची रसचर्चा तुमच्याशिवाय कोण करणार? रसचर्चा अधुरीच सोडून गेलात... महामानवाने मांडलेली! तुम्हीच म्हणता ना...!

*'दुष्टांनी पोचविली आहे पृथ्वीला इजा*
*कवी जाणतात हे सर्व*
*कवीच पृथ्वीला वाचवू शकतात*
*सर्वनाशापासून!'*

संपादक
महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, पुणे ३०, फोन- ९७६७६९९३१९

---

**लेखनाधार :**
(१) नामदेव ढसाळांचे '।। मी मारले सूर्याच्या रथाचे सात घोडे ।।' (काव्य)/२००५
(२) रसविचार आणि प्राचीन दर्शनकार – म.म. यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे (मराठवाडा साहित्य परिषद प्रकाशन, हैदराबाद/इ.स. १९५७)
(३) भारतीय काव्यशास्त्राची उत्क्रान्ति – प्रथम युग – डॉ. वा. के. लेले प्रकाशन : सौ. मालती वा. लेले, वारणसी/जानेवारी १९७०. विक्री व्यवस्था – पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४
(४) मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा – प्रभाकर पाध्ये, मौज प्र./१९७६.

संपर्क : ७ 'सूर', गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५ भ्रमणभाष : ९७६७६९९३१९

# 'म.सा.प.'चा पुराणपुरुष — म. श्री. दीक्षित

– डॉ. मेधा सिधये

साधारण १९८४-८५ च्या सुमारास मी म.सा.प.च्या ग्रंथालयात जाऊ लागले. तिथे स्वच्छ पांढरा झब्बा-पायजमा आणि वर जाकीट घातलेले एक गृहस्थ नेहमी काहीतरी वाचत-लिहीत बसलेले दिसत. मी पुण्यात नवीन होते. साहित्यक्षेत्रातल्या कोणाशीच फारशी ओळख नव्हती आणि आपणहून कोणाशी ओळख करून घेणे, बोलणे हा स्वभाव नव्हता. काही दिवसांनी कळले; हे म. श्री. दीक्षित! पूर्वी म.सा.प.च्या कार्यकारिणीवर होते वगैरे. नंतर एकदा त्यांनीच माझी ओळख करून घेतली; आणि पुढे गप्पा मारता मारता माटे मास्तर, म.सा.प. तिथले कार्यकर्ते, पुण्यातल्या वाङ्मयीन, सांस्कृतिक संस्था यांविषयी सांगत राहिले. नंतरच्या काळात कधी तरी घरी येत, आम्हां उभयतांना जुन्या पुण्यातल्या हकीकती सांगत. म.सा.प. विषयी बोलत आणि गप्पांचा शेवट होई, 'मला एकदा तुमच्या वेंगुर्ल्याला घेऊन चला', या वाक्याने. तो योग काही आला नाही. त्यांना प्रवास झेपणे शक्य नव्हते. त्या काळातली ती त्यांची इच्छा.

म. श्रीं.ची वृत्ती हौशी, आनंदी, सौंदर्यासक्त होती. इतिहास आणि मराठी साहित्य यांविषयी त्यांना जिव्हाळा होता. म.सा.प. हा त्यांचा श्वास होता आणि थोर साहित्यिकांचा सहवास हा ध्यास होता. त्यांनी साहित्यक्षेत्रातील खूप माणसे जवळून पाहिलेली होती. त्यामुळे माणूस म्हणून कोण कसा आहे हे त्यांना माहीत असे. त्यांची मते, त्यांचे अभिप्राय मला नेहमीच पटत असत असे नाही. मी स्पष्टपणे त्यांना तसे, सांगत असे. ते हसत, 'अहो मेधाताई, जग असंच आहे. चालायचंच.' असे म्हणत.

म. श्री. शेवटचे म.सा.प. मध्ये आले तो दिवस आठवतो. मी ग्रंथालयातून खाली आले; आणि कार्यालयात त्यांना बसलेले पाहिले. माझ्याकडे लक्ष गेल्यावर हाक मारली, 'या, या. आत या, नातवाने आणून सोडलं इथे म्हणून येता आलं. नाहीतर मी कसला येतो!' पाय थकले होते. बोलण्यात थोडे विस्मरण जाणवत होते. पण खूप दिवसांत परिषदेच्या वास्तूचे दर्शन नाही म्हणून बेचैन झालेले म. श्री. ओढीने आले होते. सर्वांच्याबरोबर चहा घेतला. तीच त्यांची म.सा.प. मधली शेवटची भेट.

म.सा.प.चे कार्याध्यक्ष असलेल्या प्रा. श्री. म. माटे यांनी एप्रिल १९४७ मध्ये म. श्रीं. ना कार्यालय अधीक्षक म्हणून म.सा.प. मध्ये आणले. अल्पवेतन असले तरी म. श्रीं. ना इथेच येण्याची इच्छा होती. ते १९७२ पर्यंत त्या पदावर होते. नंतर पुढे म.सा.प.चे नऊ वर्षे कार्यवाह, चार वर्षे कोषाध्यक्ष, नऊ वर्षे कार्यकारी विश्वस्त अशी पदे त्यांनी सांभाळली. सेहेचाळीस वर्षांचा म.सा.प.शी असलेला त्यांचा ऋणानुबंध १७ फेब्रु. २०१४ रोजी त्यांच्या निधनाने संपला.

म. श्रीं. चा जन्म १६ मे १९२४ रोजी खेड राजगुरूनगरच्या दीक्षितांच्या वाड्यात झाला. ती पेशवेकालीन वास्तू होती. प्राथमिक शिक्षण खेडला झाले. पुढे ते थोरल्या बंधूंकडे नागपूरला गेले. हिस्लॉप कॉलेजमध्ये डॉ. शं. दा. पेंडसे, प्रा. भ. श्री. पंडित यांच्या उत्कृष्ट अध्यापनामुळे मराठी साहित्याची गोडी लागली. १९४४ मध्ये त्यांनी नागपूर सोडले; आणि खेडच्या कोर्टात सहा महिने कारकुनी केली. पुण्यात आल्यावर प्रा. माटे यांचे लेखनिक म्हणून काम केले. त्यांच्यामुळेच म.सा.प. मध्ये येण्याची इच्छा झाली. दुसरे 'सार्वजनिक काका' म्हणायला हरकत नाही इतके त्यांनी विविध संस्थांमध्ये नि:स्वार्थी वृत्तीने कार्य केले. पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेचे ते १९७३ ते १९८३ या काळात कार्यवाह होते. पुणे नगरवाचन मंदिरात १९८८ ते १९९१ कार्यवाह, १९९१ ते १९९३ कार्याध्यक्ष होते. सार्वजनिक सभेचे १९९५ ते १९९८ उपाध्यक्ष होते. भारत इतिहास संशोधन मंडळ, ग्रंथोत्तेजक



अनुक्रमणिका

सभा, भारत गायन समाज या संस्थांशी त्यांचा संबंध होता. सार्वजनिक कार्याची आवड असूनही, वेगवेगळी पदे मिळालेली असूनही वयाच्या पंचाहत्तरीत त्यांनी या कामांमधून मुक्त होण्याचा, कोणतीही पदे न स्वीकारण्याचा निर्णय घेतला ही गोष्ट विशेष आहे. अनेक व्यक्ती शेवटपर्यंत खुर्ची सोडत नाहीत, हे आपण पाहातो. म. श्रीं. ना तो मोह नव्हता.



प्रा. श्री. म. माटे, दत्तो वामन पोतदार आणि जयंतराव टिळक या तिघांना ते आपल्या सार्वजनिक कार्यातले गुरू मानत. 'केसरी'शी अर्थातच त्यांचा निकटचा संबंध होता. श्री. जयंतराव टिळकांचे म. श्रीं. वर नितांत प्रेम होते. त्यांच्यामुळे म. श्रीं नी पुण्यातल्या नामवंत व्यक्तींच्या घरांवर नीलफलक लावण्याचे काम स्वीकारले. प्रतापी बाजीराव पुतळा समितीवरही त्यांनी आणि कॅ. वासुदेव बेलवलकर यांनी काम केले. पुतळ्यावर कोरलेला मजकूर म. श्रीं. नी लिहिलेला आहे.

लेखनाची आवड म्हणून आणि स्वत:पुरते चार पैसे कमवावेत म्हणून म. श्रीं नी छोटी-छोटी चरित्रे, व्यक्तिचित्रणात्मक पुस्तके लिहिली. भारतरत्न नेहरू, नेपोलियन, सत्तावनचे सप्तर्षी, प्रतापी बाजीराव ही पुस्तके, तसेच आम्ही चित्पावन, नाट्यपदांवरील पुस्तक, मी : मश्री हे आत्मचरित्र असे लेखन त्यांनी केले. स्मरणिका संपादनाचे काम केले. अनेक ग्रंथांच्या सूची तयार करण्याचे काम केले. म. सा. प. चा इतिहास लिहिला. त्यात अ. भा. मराठी साहित्य संमेलनावर एक प्रकरण आहे. प्रवास झेपत होता तोपर्यंत प्रत्येक संमेलनाला ते उपस्थित राहात असत. म. सा. प. च्या व साहित्य संमेलनाध्यक्षांच्या निवडणुका, महामंडळाची कार्यपद्धती, घटना यांची त्यांना उत्तम माहिती होती.

संगीत नाटके, नाट्यसंगीत यांची त्यांना विशेष आवड होती. संगीत नाटके पाहात. शास्त्रीय संगीतही आवडे. इतिहास, साहित्य, संगीत आणि वाङमयप्रेमी रसिक माणसे यात ते रमत. सदैव हसतमुख, प्रसन्न असे हे व्यक्तिमत्त्व होते. नियमित आहार-विहार प्रत्येक बाबतीत काटेकोरपणा, स्वच्छता, टापटीप, प्रामाणिक वृत्ती ही त्यांची वैशिष्ट्ये जाणवत. त्यांच्या पिढीतली बहुतेक माणसे असतात तसेच ते परखड, शिस्तप्रिय, वेळेचे महत्त्व मानणारे, स्वाभिमानी होते. पण या गुणांमुळे कधी कधी दिसणारे काटेरीपण त्यांच्याजवळ नव्हते. दुसऱ्याच्या चांगल्या गुणांचे, चांगल्या लेखनाचे, वक्तृत्वाचे कौतुक करण्याची वृत्ती होती. शक्य ती मदत करण्याचा, संधी देण्याचा स्वभाव होता. त्यांनी माणसे जोडली. आपले शारीरिक, मानसिक दु:ख बाहेर दिसू दिले नाही. म. सा. प. वर जिवापाड प्रेम केले, पण कधी कामकाजात ढवळाढवळ केली नाही. तिथे व्याख्याने ऐकायला येत, भिंतीजवळच्या त्यांच्या ठरलेल्या खुर्चीवर बसत. शांतपणे घरी जात. आतून उमाळा असतानाही ही शांत, अ-लिप्त वृत्ती कमी लोकांमध्ये दिसते. म्हणूनच म. श्रीं. ना. म.सा.प. मध्ये शेवटपर्यंत मान होता. त्यांना नेहमीच आदराने वागवले जाई. हा म.सा.प.चा पुराणपुरुष होता. पुण्याच्या वाङ्मयीन सांस्कृतिक जीवनाचा साक्षीदार होता. म. सा. प. च्या शताब्दी वर्षात म. श्रीं. चा सत्कार केला गेला. त्यांनी नव्वदीत पदार्पण केले तेव्हाही म. सा. प. मध्ये सत्कार झाला. त्यांच्या लेखनालाही काही पुरस्कार मिळाले. सदाशिवपेठ भूषण म्हणूनही त्यांना गौरविण्यात आले. त्यांच्या आवडीच्या क्षेत्रात म. श्री. मन:पूर्वक वावरले. म.सा.प.शी एकरूप झाले.

'मसाप'च्या पायऱ्या चढणारी ही मूर्ती दिसणार नाही, याचे सर्वांनाच दु:ख आहे. १६ मे १९२४ रोजी सुरू झालेला मश्रीं चा जीवन प्रवास १६ फेब्रुवारी २०१४ ला पूर्ण झाला.

म. श्रीं. ना विनम्र श्रद्धांजली!

**डॉ. मेघा सिधये**
व्यंकटेश अपार्टमेंट,
१२०४, सदाशिव पेठ, लिमये वाडी, पुणे ३०
फोन : ९८८१००१९३१



अनुक्रमणिका

**भारतीय भाषांच्या लोकसर्वेक्षणाचे विराट दर्शन घडविणारा संशोधक, समाजसेवी लोकभाषा अभ्यासक :**

# डॉ. गणेश देवी

– डॉ. अनिल सहस्रबुद्धे

*[भारतीय समाजपुरुष अनेक हातांनी बहुविध कार्य करतो, हजारो पायांनी जीवनाच्या विविध क्षेत्रांना पादाक्रान्त करतो, हजारो डोळ्यांनी आपलेच जीवन अनेकांगांनी पाहतो, हजारो मस्तकांनी विचारवैभवात भर घालतो; आणि हे सर्व हजार मुखांनी बोलतोही! या विराट समाजाने आपापल्या भाषेतून लोकजीवनाचे आणि संस्कृतीचे दर्शन घडविले. भाषा आणि संस्कृतीचे अतूट नाते आहे. भारतीय लोकभाषांच्या महासर्वेक्षणातून, आपल्या अथक कार्याने, अनेक भाषाभ्यासकांना बरोबर घेऊन डॉ. गणेश देवी यांनी भाषा-समाज-संस्कृतीचे हे विराट दर्शन घडविले आहे. भारत सरकारने 'पद्मश्री' पुरस्काराने त्यांचा यथोचित गौरव केला आहे. या निमित्ताने डॉ. देवी यांच्या ह्या कार्याचा आढावा घेतला आहे, लोकभाषेचे अभ्यासक डॉ. अनिल सहस्रबुद्धे ह्यांनी! – संपादक]*

भारतीय राष्ट्र उभारणीचे ध्येय उराशी बाळगून; आदिवासी समाजामध्ये संशोधन आणि सेवावृत्तीने कार्यसातत्य राखणाऱ्या, भारतातील मोजक्या, ख्यातकीर्त सेवाभावी कार्यकर्त्यांमध्ये डॉ. गणेश देवी यांचे कार्य विशेष मूलभूत आणि लक्षवेधी आहे. पारतंत्र्याच्या काळात, गत तीन-चारशे वर्षांमध्ये कंपनी सरकार (ब्रिटीश सरकार) आणि त्यांच्या आशीर्वादाने स्थापन झालेल्या, अनेक तथाकथित सेवाभावी संस्थांनी, आदिवासींमध्ये समाज, संस्कृती व भाषा याविषयी क्षेत्रीय अभ्यास करून आदिवासी समाज, संस्कृती व भाषा यांची प्राचीनता, प्रामुख्याने त्यांच्या पृथगात्मतेची नोंद केली. परिचय करून दिला. राज्यकारभाराच्या सोयीच्या दृष्टीने ग्रंथरूपाने, माहिती-पुस्तिकांच्या रूपाने, संस्कृतिकोश आणि भाषाकोश या रूपाने माहिती प्रसिद्ध केली आहे. त्यांनी तयार केलेली एकोणिसाव्या शतकातील जिल्हावार व प्रांतवार 'गॅझेटे' त्यांच्या या कार्याची साक्ष देतात. ही पार्श्वभूमी विचारात घेऊन डॉ. गणेश देवी यांनी राष्ट्रीय ध्येयाने संशोधन केले. आदिवासींमध्ये थेट जाऊन; निरीक्षण, सर्वेक्षण, नोंदी घेण्याचे कार्य हाती घेतले. आदिवासी समाजाच्या सेवाकार्याच्या माध्यमातून त्यांनी हे कार्य सुरू केले. 'ढोल'सारख्या विविध नियतकालिकांतून, दैनिकातून आपल्या व आपल्यासह अनेकांच्या अभ्यासातून पुढे येणाऱ्या माहिती व संशोधनाला जगापुढे आणले.

डॉ. गणेश देवी यांनी आदिवासीविषयक सामाजिक व सांस्कृतिक सेवाकार्य करीत असतानाच; आदिवासी लोकजीवनाच्या परंपरा, संस्कृती आणि भाषांच्या अभ्यासासाठी गुजरातमधील बडोदा येथे 'भाषा संशोधन आणि प्रकाशन केंद्र' या संस्थेची स्थापना केली; आणि विशेष भाषिक संशोधनाला जोमाने सुरुवात केली. भाषा हे केवळ संपर्कमाध्यम नसते; तर भाषा ही त्या त्या लोकजीवनाचे समग्र सांस्कृतिक दर्शन, परंपरा आणि वर्तमानही असते. एवढेच नव्हे, तर भाषा व भाषेच्या परिवर्तनशील रूपातून लोकजीवनाचा भविष्याकडे प्रवास सुरू असतो. या दृष्टीने, आदिवासींच्या सामाजिक उन्नतीबरोबरच, सांस्कृतिक उन्नयनाचे एक स्वप्न डॉ. देवी यांनी पाहिले. भाषा आणि संस्कृतीच्या अभ्यासात



अनुक्रमणिका

लोकसाहित्यांच्या शास्त्रशुद्ध अभ्यासाचे महत्त्व त्यांनी ओळखले. त्यातून क्षेत्रीय अभ्यासाचा मार्ग अधिक प्रशस्त होत गेला.



या अभ्यासातून अनेक भाषावैज्ञानिक प्रश्न त्यांच्यासमोर आव्हान स्वरूपात उभे राहिले. सर्वशक्तीनिशी या प्रश्नांची शास्त्रीय उत्तरे शोधून भाषांचे संरक्षण, शुद्धीकरण, संवर्धन, ऐतिहासिक अवशेषांचे जतन आणि अभ्यास करणे या गोष्टी त्यांना महत्त्वाच्या वाटल्या. मौखिक परंपरा, विविध जातीजमाती, प्रदेश, लोकसंस्कृती यांच्या लुप्त होत चाललेल्या भाषा यांची जपणूक, संरक्षण व दस्तऐवजीकरण करणे अशा प्रकारचा प्रकल्प या केंद्राकडून उभारला गेला. मोठ्या प्रयत्नाने, राष्ट्रीय पातळीवरील भाषा व संस्कृती यांचे संशोधन व अभ्यास करणारे तज्ज्ञ आणि राज्य आणि केंद्रातील शासनकर्ते यांना या कार्याचे महत्त्व पटवून देण्यासाठी डॉ. गणेश देवी क्रियाशील झाले.

या त्यांच्या प्रयत्नातून एका महाकाय भाषा-प्रकल्पाची निर्मिती झाली; ही भारतीय भाषांच्या दृष्टीने आश्वासक गोष्ट होय. डॉ. गणेश देवी हे महाराष्ट्रीय संशोधक असल्याने, महाराष्ट्र हा प्रदेश, राष्ट्रीय आणि भौगोलिक दृष्टीने केंद्रस्थानी असल्याने, भाषिक अभ्यासाचे व्यापक गांभीर्य डॉ. देवी यांना सहज ज्ञात होते. त्यांनी आपल्या 'भाषा संशोधन आणि प्रकाशन केंद्र' या भाषा केंद्रातर्फे ८, ९ व १० मार्च २०१० ला बडोदा येथे 'भाषा संगम' (Bhasha Confluence At Ground Zero) हा राष्ट्रीय पातळीवरचा मोठा कार्यक्रम आयोजित केला. त्यात भारताच्या जवळपास सर्व भागांतून भाषातज्ज्ञ, संशोधक आणि अगदी आदिवासी, भटके, विमुक्त यांसह विविध लोकसमूहांचे कार्यकर्तेही या कार्यक्रमास उपस्थित होते. ज्येष्ठ साहित्यिक महाश्वेतादेवी आणि ज्येष्ठ गांधीवादी नेते नारायणभाई देसाई यांच्या मार्गदर्शनाखाली विविध चर्चासत्रे झाली. यांत भाषाविषयक विविध प्रश्नांची सखोल चर्चा झाली. प्रश्न सोडविण्याविषयीची उपाययोजना शोधण्याचा सकारात्मक प्रयत्न झाला. त्याचे फलित स्वरूप म्हणजे 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' हा प्रकल्प उभारण्याचा संकल्प झाला. हे अत्यंत धाडसाचे, जिकिरीचे आणि अतिमहत्त्वाचे संशोधनकार्य होते. डॉ. गणेश देवी यांनी सामूहिक कार्यसेवेच्या बळावर हा जगन्नाथाचा रथ ओढण्याचा व तो अपेक्षित सुस्थानी नेण्याचा संकल्प केला. यातून डॉ. गणेश देवी यांच्या अध्यक्षतेखाली; डॉ. डी. पी. पट्टनायक, डॉ. के. के. चक्रवर्ती आणि डॉ. शिव विश्वनाथ या निमंत्रकांच्या नेतृत्वाखाली सर्व प्रांतांचे विशिष्ट प्रतिनिधी नेमले. तसेच संपादक व प्रकाशक मंडळे नेमून एक व्यापक समिती कार्यान्वित झाली. या महामंडळाच्या माध्यमातून – 'भाषेच्या माध्यमातून शांती आणि सामंजस्य, भाषेच्या पुनरुत्थानासाठी आदानप्रदान, भाषेचे धोरण ठरविणे, अल्पसंख्य समाजाच्या भाषाविषयक प्रकल्पांची गुणात्मकता पाहणे, सांस्कृतिक आणि भाषिक वैविध्यतेचा अभ्यास करणे, शिक्षण, प्रशिक्षण यासंबंधीची साधनसामग्री उपलब्ध करून देणे अशी भाषाविषयक महत्त्वपूर्ण कामे म्हणजे PLSI – भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण हा प्रकल्प होय.' असा भाषाविषयक महाप्रकल्प डॉ. गणेश देवी यांच्या प्रयत्नांतून उभा राहिला. यात आंध्र, अरुणाचल, आसाम, बिहार, छत्तीसगड, गोवा, गुजरात, हरियाणा, हिमाचल, जम्मू आणि काश्मीर, झारखंड,

कर्नाटक, केरळ, मध्यप्रदेश, महाराष्ट्र, मणिपूर, मेघालय, मिझोराम, नागालँड, ओरिसा, पंजाब, राजस्थान, सिक्कीम, तमिळनाडू, त्रिपुरा, उत्तरप्रदेश, उत्तराखंड, पश्चिम बंगाल, अंदमान निकोबार, चंदीगड, दादरा आणि नगर हवेली, दीव-दमण, दिल्ली, लक्षद्वीप, पाँडेचरी, सिंधी/संस्कृत/नेपाळी, उर्दू/पर्शियन/अरेबिक, इंग्रजी/फ्रेंच/पोर्तुगीज, मुक्यांची सांकेतिक भाषा या विभागांमध्ये खंडात्मक स्वरूपात 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' ग्रंथ प्रसिद्ध केले. सामूहिक जबाबदारीने उभारलेला सर्वांत मोठा सेंद्रीय प्रकल्प म्हणून डॉ. गणेश देवींच्या या प्रकल्पाची जगातील महत्त्वपूर्ण भाषा संशोधन प्रकल्प म्हणून नोंद घ्यावी लागेल अशी ही ऐतिहासिक कामगिरी होय. १३ फेब्रुवारी २०१४ च्या मुलाखतीत डॉ. देवी म्हणाले, ''भारतात असलेल्या ७८० भाषांचे भवितव्य, आपण दुर्लक्ष केले तर; धोक्यात येईल'' हा विचार केला तर या प्रकल्पाचे महत्त्व विशेषत्वाने लक्षात येते. डॉ. देवी यांनी ८६० भारतीय भाषांच्या अस्तित्वाचा शोध घेतला आहे. 'लोकसंस्कृती वाचली तर भाषा वाचतील'– हे त्यांचे विचार मानवाच्या जीवनप्रवासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. धीरूभाई अंबानी इन्स्टिट्यूटमध्ये माहिती आणि जनसंपर्काचे प्राध्यापक म्हणून काम करणाऱ्या डॉ. गणेश देवींनी भारतीय भाषांच्या लोकसर्वेक्षणाचे केलेले कार्य म्हणूनच भूषणावह आहे.

**महाराष्ट्र खंड**

'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' या प्रकल्पातील 'महाराष्ट्र' या खंडाचे अवलोकन केले तर मराठी भाषेच्या वैभवाचा परिचय होतोच. त्याचबरोबर एकूण प्रकल्पाच्या स्वरूपाचा परिचयही होतो. पद्मगंधा प्रकाशनाचे प्रकाशक श्री. अरुण जाखडे यांनी 'महाराष्ट्र' खंडाच्या संपादनाचे काम केले आहे. एकूण पन्नास 'व्हॉल्यूम'मधील 'महाराष्ट्र' हा एक 'व्हॉल्यूम' होय. या खंडाच्या प्रस्तावनेत डॉ. गणेश देवी यांनी एका महत्त्वाच्या भाषिक शोषणाकडे लक्ष वेधले आहे. ते लिहितात, 'भारतीय बुद्धिवाद्यांनी इंग्रजी शिक्षणाला एक शब्द दिला आहे. तो म्हणजे 'मेन स्ट्रिमिंग'- मुख्य प्रवाहात आणणे. म्हणजेच लहान लहान समूहांकडून बोलल्या जाणाऱ्या भाषा, त्यांची संस्कृती मुख्य समाजापासून वेगळी आहे. ती बहुसंख्यांची नव्हे, तर अल्पसंख्यांची आहे, तेव्हा ती आवश्यक नाही, असे ठरवून त्यांना मुख्य प्रवाहाशी म्हणजेच मुख्य समाजाशी, बहुसंख्यांशी मिळतंजुळतं घ्यायला लावणे, मुख्य प्रवाहाची भाषा, संस्कृती स्वीकारायला भाग पाडणे. हा खरं तर वंशसंहारच आहे. आपल्या नैसर्गिक अधिवासापासून म्हणजेच जंगलं तसंच डोंगरकपारीपासून निर्वासित झालेल्या आदिवासींकडून त्यांची भाषा, त्यांची संस्कृतीदेखील हिसकावून घेतली जाते आणि त्यांना स्थानिक, प्रादेशिक भाषेचा मातृभाषा म्हणून स्वीकार करावा लागतो.' ते पुढे लिहितात, 'भारतीय समाज हा समूहाने जगणारा समाज आहे. तो द्वैत मानणाऱ्या, व्यक्तिवादाला प्राधान्य देणाऱ्या पाश्चिमात्य समाजापेक्षा वेगळा आहे. विविध भाषा, विविध संस्कृती, एकत्र कुटुंबं, वेगवेगळे समाज यांच्या संदर्भातील हेच सांगता येतं. हजारो वर्षांपूर्वी म्हटलं गेलं आहे–

*अयं निज: परो वेति गणना लघुचेतसाम*
*उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम् ।*

'मी' आणि 'इतर' असा भेद संकुचित मनाच्या व्यक्तीच करू शकतात. व्यापक मनाच्या व्यक्ती सगळं जग हेच आपलं कुटुंब आहे, असं मानतात. भारतात हीच गोष्ट सामाजिक पातळीवर रोजच्या जीवनात बोलींच्या बाबतीत पाहायला मिळते.' डॉ. देवी यांच्या प्रस्तावनेतील या उल्लेखाने 'भारतीय

भाषांचे लोकसर्वेक्षण' या प्रकल्पाची व्यापक भूमिका सहज लक्षात येते.

**महाराष्ट्राच्या बेचाळीस भाषांचे लोकसर्वेक्षण**

'महाराष्ट्र' या खंडात जवळपास बेचाळीस भाषा सर्वेक्षक व चर्चकांचे प्रयत्न समाविष्ट आहेत. संपादक अरुण जाखडे यांनी महाराष्ट्रासंदर्भात भूमिका आणि पद्धती स्पष्ट केली आहे. ते लिहितात, 'महाराष्ट्राची भाषिक संस्कृती बहुआयामी आणि बहुविध आहे. ती दुर्मिळ होत आहे... या निमित्ताने ह्या प्राचीन भाषिक संस्कृतीचे, तिच्या परंपरेचे स्मरण झाले, नोंद करता आली.' एकूण महाराष्ट्र भाषांचा हा दस्तऐवज आहे, असे त्यांनी नोंदविले आहे. डॉ. देवी यांनी या प्रकल्पाच्या निमित्ताने भारतीय भाषांचा दस्तऐवज वज्रलिपित केला आहे हे नाकारता येत नाही.

सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजचे विद्यार्थी डॉ. देवी यांनी शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर आणि लीड्स विद्यापीठ, इंग्लंड येथून आपले शिक्षण पूर्ण केले. त्यांनी कोल्हापूर, सुरत, बडोदा, गांधीनगर येथे प्राध्यापक म्हणून काम केले आहे. अभ्यासक, संशोधक, व्यासंगी प्रतिभावंत डॉ. देवी यांचे लेखन प्रामुख्याने इंग्रजी आणि गुजरातीतून असले तरी त्यांनी मराठी सारस्वताचीही सेवा केली आहे. त्यांच्या नावावर साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त 'आफ्टर ॲम्नेसिया' या ग्रंथासह 'ऑफ मेनी हिरोज', 'इन अनदर टंग', 'पेंटेड वर्डस्', 'इंडियन लिटररी क्रिटीसीझम', 'ट्रॅडिशन ॲन्ड मॉडर्निटी', 'अ नोमॅड कॉल्ड थीफ' असे इंग्रजीतून ग्रंथलेखन केले. 'आदिवासी जाणे छे' हा गुजराती आणि 'वानप्रस्थ' हा अनेक पुरस्कारप्राप्त मराठी ग्रंथ, अशी विपुल ग्रंथसंपदा आहे. 'आदिवासी अकादमी', 'भाषा संशोधन-प्रकाशन केंद्र', 'हिमलोक इन्स्टिट्यूट', 'ग्राम विकास' अशा संस्थांच्या माध्यमातून त्यांचे सेवाकार्य सुरू आहे. यातूनच त्यांना भारतीय बोली व प्रादेशिक भाषांचा आवाका आला. त्यातून भाषांच्या सामंजस्यपूर्ण लोकजीवनवर्तन प्रचलनाची जाण त्यांना आली. या भाषाप्रकल्पाचा व्याप सर्वसमावेशक करण्यासाठी त्याचा उपयोग झाला. 'महाराष्ट्र' या खंडातही याचा प्रत्यय येतो.

**महाराष्ट्र खंडाचे चार विभाग**

चार विभागात संपादित केलेल्या 'महाराष्ट्र' या खंडात पहिल्या विभागात (अ) मध्ये– मराठी आणि मराठीची रूपे, अन्य रूपे आणि सामाजिक उपरूपे यांसह मराठी प्रकाशने आणि अभिजात मराठीची वाटचाल समाविष्ट असून; अहिराणी, आगर, कोहली, खानदेशी, चंदगडी, झाडी, तावडी, पोवारी, मालवणी, वऱ्हाडी, वाडवळी, सामवेदी, संगमेश्वरी अशी मराठीची रूपे परिचित होतात. (ब) मध्ये– सिंधी आणि उर्दू या मराठीतर भाषांची रूपे पाहता येतात.

दुसऱ्या विभागात कातकरी, कोकणा, कोरकू, कोलामी, गोंडी, गोंडी-थाट्या, गोंडी-माडिया, ठाकरी, ठाकूर क, ठाकूर म, ढोरकोळी, निमाडी, निटाली, परधानी, पावरी, भिल्ली/भिलोरी/देहवाली, मथवाडी, मल्हारकोळी, मावची, मांगेली, राठ्या (बारेला), वारली, हलबी या आदिवासी लोकभाषांचा परिचय होतो.

तिसऱ्या विभागात– भटक्या-विमुक्तांच्या कुंचीकोरवा, कैकाडी, कोल्हाटी, गुप्त व सांकेतिक भाषा, गोरमाटी, गोल्ला, गोसावी, घिसाडी, चितोडिया, छप्परबंद, डोंबारी, नंदीवाले, पारधी, पारुषी-नायपंथी डवरी, पारुषी-मांग, पारुषी-मांग गारुडी, बेलदार, वडारी, वैदू या लोकभाषांचा परिचय होतो.

चौथ्या विभागात– दख्खनी, नॉ लींग या अन्य भाषांची रूपे परिचित होतात. परिशिष्टे पाहाता

कृषिसंस्कृतीतील काही शब्द, शेतीची साधने, घरातील वस्तू आणि बलुतेदारांचे बोलण्यातील शब्द नोंदविले आहेत. सातशेवीस पृष्ठांच्या या ग्रंथात, प्रत्येक भाषेचे प्रारूप आपणास ज्ञात व्हावे, अशा नोंदी देण्याचा प्रयत्न केला आहे. भाषेचा इतिहास, परिक्षेत्र व त्याचे उपविभाग, मौखिक साहित्य व लिखित साहित्य, लोककथा, लोकगीते आदि लोकसाहित्य प्रकारांतून भाषा-परिचय होतो. नामे, सर्वनामे, क्रियापदे, नातेसंबंध, रंग, ऋतु, वार, महिने, अंक, मापे, अंतरे, खाणंपिणं, दिशा, शेती-वनस्पती, गुणदोष, प्राणी, पक्षी, कपडे, सामाजिक व्यवहार, वाक्प्रचार, म्हणी यांविषयी शब्द, नामे व त्यांचे चलन सहज लक्षात येईल. मौखिक परंपरेतील लोकसाहित्याचे नमुने देऊन भाषेची प्रमाणितता स्पष्ट केली आहे.

महाराष्ट्राच्या लोकभाषांच्या या प्रारुपांमुळे महाराष्ट्राच्या विविध प्रादेशिक विभागांतील प्राचीनतम साहित्य आणि भाषारूपे अभ्यासण्याचे साधन तर प्राप्त झाले आहेच, परंतु 'महाराष्ट्रा'सारख्या, अनेक भिन्नभाषिक सीमांवर, मध्यवर्ती स्वरूपात स्थित असलेल्या व्यापक भूप्रदेशाची वैविध्यपूर्ण भाषिक लोकसंस्कृती अभ्यासण्यास मदत होते. मराठी भाषेअंतर्गत विविध बोलींचा तुलनात्मक अभ्यास करण्यासाठी या दस्तऐवजाचा उपयोग होऊ शकतो. मराठी भाषेची अभिजातता, मराठी भाषेची परंपरा व जडणघडण जाणून घेण्यासही या लोकसर्वेक्षणाचा मूलगामी उपयोग होऊ शकतो. भाषेचा ऐतिहासिक, वर्णनात्मक आणि सामाजिक भाषाविज्ञानाच्या अंगानी अभ्यास करून मध्यवर्ती भाषेचा विकास आणि घटना समजून घेण्यास आणि मराठी वाङ्मयाचे शैलीविज्ञानात्मक आणि प्रादेशिक स्वरूपातील परिशीलन करण्यासाठीही या प्रकल्पाचा पायाभूत उपयोग होऊ शकतो.

'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' हा प्रकल्प व्यापक स्वरूपात प्रथमच उभारलेला दिसत असला तरी तो केवळ प्राथमिक अभ्यास नसून; आजवर झालेल्या पूर्वसुरींच्या अभ्यासाचा दस्तऐवज साकारलेला प्रकल्प आहे.

भारतातील लोकभाषांचे सांस्कृतिक एकात्मपण, प्राचीन भाषाकुलात्मक एकात्मपण आणि लोकजीवनात्मक वैविध्यासह केंद्रवर्ती एकात्मपण संवेदित करण्यास तर या प्रकल्पाचा उपयोग आहेच. परंतु भाषांच्या संरक्षण-संवर्धनाबरोबरच जागतिक परिक्षेत्रातील भाषांच्या कुलपरंपरेतील प्राचीनता आणि केंद्रीभूत भाषामूलकता अधोरेखित करण्यासही या प्रकल्पाचा उपयोग होईल, यात शंका नाही. डॉ. गणेश देवी यांनी राष्ट्रीय आणि वैश्विक जाणिवेने संकल्पित केलेला हा प्रकल्प यशस्वी ठरला आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय नसावा. तज्ज्ञांना बरोबर घेऊन व्यापक सामंजस्याने उभारलेल्या या प्रकल्पाच्या यशस्वितेबद्दल डॉ. गणेश देवी यांचे अभिमानपूर्वक अभिनंदन करावेसे वाटते. कोणे एकेकाळी संस्कृत भाषेचे समग्र व्यवस्थापन करण्याचा प्रकल्प हाती घेऊन तपश्चर्यापूर्वक तो परिपूर्ण करणाऱ्या पाणिनीची समर्थ भारतीय अभ्यास, संशोधनपरंपरा डॉ. गणेश देवी यांच्या रूपाने पुन्हा एकदा अनुभवता आली; एवढे हे कार्य गौरवास्पद आहे. राष्ट्रीय पद्म पुरस्काराने डॉ. गणेश देवी यांचा झालेला गौरव ह्या भाषिक परंपरेचा गौरव झाला आहे.



**प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे**
'आई'
समर्थनगर, श्रीराम चौक,
पाईपलाईन रोड, अहमदनगर ४१४००३
दूरभाष : (०२४१) २४२४१६७
भ्रमण भाष : ९८८१५००९४२

**जर्मनीतील तीन तपांच्या सहवासाच्या**

## 'आठवणींच्या जगात' — निरुपमा प्रधान-सोनाळकर

– श्रीमती कुमुद गाडगीळ

*[आत्मचरित्रात्मक लेखन अनेक रूपात असते. कथा-कादंबरीच्या गुप्तवेशातही ते असते. समीक्षकांना त्याचा शोध घ्यावा लागतो. 'डायरी' लेखन, पत्रव्यवहार, आठवणी आणि अनुभवलेखन ह्यातही आत्मनिवेदन असते. आत्मनिवेदन आत्मचरित्रापेक्षा सखोल संवेदनांशी नाते जोडते. आठवणी जर नव्या भूप्रदेशातील असतील तर त्यातील आत्मशोध तुलनात्मक वाटेवरून अधिक समृद्ध होत जातो. निरूपमा प्रधान-सोनाळकर ह्यांनी विवाहानंतर आपले माहेरघरच सोडले नाही तर मायदेशही सोडला. त्यांचे नाते एका वेगळ्या सामाजिक-सांस्कृतिक लोकजीवनाशीही जोडले गेले. आणि ते जीवन त्या ३५ वर्षे जगल्या. आपल्यातल्या निर्मितीक्षम व्यक्तित्त्वाचा शोध घेत-घेत नव्या सांस्कृतिक लोकजीवनाला आणि अनुभवांनाही जगत गेल्या. आठवणींचा हा प्रवास सिंदबादच्या सफरीइतकाच रोमांचक आणि उद्बोधकही आहे. 'An autobiography is a connected narrative of author's life, with some stress laid upon introspection.' अशी C. Hugh Holman याने आत्मचरित्राची संपादित केलेली व्याख्या डॉ. संगीता बर्वे ह्यांच्या ह्या आत्मचरित्रात्मक लिखाणाला अधिक स्पष्ट करील. श्रीमती कुमुद गाडगीळ ह्यांनी लेखिकेचे हे अंतरंग उघडून दाखविणारी समीक्षा केली आहे.*

*– संपादक]*

जर्मनीतील तीन तपांचा अनुभव असलेलं 'आठवणींच्या जगात' हे श्रीमती निरूपमा प्रधान - सोनाळकर यांचे पुस्तक ग्रंथाली प्रकाशनाने प्रसिद्ध केले आहे. लेखिका लग्नानंतर जर्मनीत स्थायिक होते. तिथे तब्बल पस्तीत वर्षे राहिल्यानंतर तिथल्या समृद्ध अनुभवांची शिदोरी घेऊन भारतात परत येते. ह्या अनुभवांची वैविध्यपूर्ण शिदोरी त्यांनी वाचकांपुढे ठेवली आहे.

लेखिका बॅडमिंटनपटू! त्यांनी कॉलेज, युनिव्हर्सिटी, स्टेटलेव्हल आणि इंडिया या सर्व स्तरांवर भरपूर मॅचेस खेळून पदकं मिळविली. कॉलेज, बॅडमिंटन, ऑडिओलॉजीचा कोर्स आणि त्यानंतर नोकरी एवढ्याच वर्तुळात निरूपमाताईंचे आयुष्य चालू होते. लग्न ठरले आणि त्यानंतर १५ दिवसांतच सगळे 'करियर' सोडून जर्मनीला जावे लागले. सुरुवातीला १।। वर्षासाठी गेलेल्या निरूपमाताईंना शेवटी तिथेच राहायच्या निर्णयाला सामोरे जावे लागले. ४०-४५ वर्षांपूर्वीच्या काळी भारतीय कुटुंबात कायमचे परदेशात स्थायिक होणे क्वचितच घडायचे, ते निरूपमाताईंच्या बाबतीत घडले. त्यापुढे तीन तपं त्या जर्मनीत राहिल्या. नुसत्याच नवऱ्याची पत्नी म्हणून न राहाता खऱ्या अर्थाने जगल्या. त्यांनी स्वतंत्रपणे स्वत:चे विश्व निर्माण केले. 'आकांक्षापुढती जिथे गगन ठेंगणे'! त्यांनी स्वत:च्या कर्तृत्वाने सिद्ध केले. त्यासाठी भरपूर कष्टही घेतले.

जर्मनीत गेल्यावर सुरुवातीलाच हाम्बुर्गमध्ये त्यांच्या शेजारी, लग्न न करता एक जोडपे राहात होते. त्यातल्या स्त्रीला दोन आठवड्याने मूल होणार होते. मुलाला नक्की कोणतं आडनाव द्यायचं हा प्रश्न उभा राहिल्यावर त्यांनी लग्न करण्याचा निर्णय घेतला. हे ऐकून लेखिका बेचैन होते. त्या लोकांची नीतिमत्ता पाहून इथे आपण कसे निभावणार असे तिला वाटते. पण पुढे-पुढे जसे पुस्तक वाचत जाऊ तसे जाणवते की ह्या समाजाशी लेखिका



अनुक्रमणिका

एकरूप झाली आहे. त्यांच्यात रुळली, समरस झाली म्हणून ती त्यांचे मन, विचारसरणी जाणून घेऊ शकली.

पुढे सोनाळकर पति-पत्नी 'ल्यूनेबर्ग' ला रहायला गेले. ह्या गावाचे सर्वांगीण वर्णन लेखिकेने केले आहे. तिथे निरूपमाताईंची भारतीय वेशभूषा बघून एक जर्मन आजी त्यांना प्रेमाने म्हणाल्या, "माझ्या आयुष्यात हे असं कधी बघायला मिळेल असे वाटले नव्हते. त्यावेळी लेखिकेला खूप आनंद झाला. त्या अभिमानाने लिहितात, "ह्या ३५ वर्षात माझी वेशभूषा बदलण्याची गरज कधीच भासली नाही.' परकीय देशात आपले भारतीयत्व आणि मराठीपण जपणे केव्हाही कौतुकास्पद आहे. पूर्वीच्या पिढीतल्या जर्मन बायकाही आपल्याप्रमाणेच 'रांधा वाढा उष्टी काढा' ह्या वृत्तीच्या होत्या. स्वातंत्र्याचे आणि समान हक्काचे वारे त्यांच्यात शिरले नव्हते. 'चूल आणि मूल' यात त्यांना आनंद वाटायचा. पण तरीही घराला मदत म्हणून लहानसहान गोष्टी त्या घरातच विकायला ठेवत असत. हेही लेखिका आंवर्जून सांगते.

दुसऱ्या महायुद्धात जर्मनी जमीनदोस्त झाली असताना मेहनतीने आणि जिद्दीने हे लोक वर आले. श्रम, कष्ट आणि शिस्त ह्या गुणांवर १५ ते २० वर्षांत हा देश प्रगतीच्या उच्चांकावर पोहोचला. हे नमूद करत असतानाच निरूपमाताई म्हणतात, "त्यामुळेच हा देश 'मटिरिॲलिस्टिक' आणि अहंकारी बनला."

लेखिकेची दोन्ही बाळंतपणे जर्मनीतच झाली, पण त्यावेळचा अनुभव मात्र चांगला नव्हता. हे सगळे सविस्तर वर्णन करून निरूपमाताई म्हणतात - "भारतात जी समजूत आहे की, जर्मन डॉक्टर किती एक्स्पर्ट असतात, तिथली ट्रीटमेंट चांगली असते हे पूर्णपणे खरे नाही. तिथे माणुसकी कमी आहे. पेशंट म्हणजे नुसतं नंबर असतात." हे अनेक वर्षांच्या अनुभवावरून लेखिका सांगते. बाळंतिणीचे लाड करायला तिथे आई किंवा सासू नसते. हे त्या देशाचे दुर्दैव! असे सांगत असतानाच तिथली आई बाळंतीण मुलीकडे जायला स्पष्ट नकार देते असा प्रसंगही उद्‌धृत करते. म्हणूनच येता-जाता अनोळखी व्यक्तीला 'हॅलो' म्हणून ग्रीट करणं किती कृत्रिम आहे हे जाणवतं.

निरूपमाताईंनी आपल्या दोन्ही मुलांना दोन्ही संस्कृतींची पौरस्त्य आणि पाश्चात्त्य संस्कृतींची ओळख करून दिली.

'हॉलंड' मध्ये एका हिरवळीवर कॅनॉलच्याजवळ पवनचक्कीसारख्या दिसणाऱ्या घराचं सुंदर वर्णन केलं आहे. घरमालकाने अगत्याने घरात बोलावून कॉफी दिली; आणि भारताबद्दल चौकशी केली. आयुष्यात काही अप्रतिम बघायला मिळाले; म्हणून निरूपमाताईंना खूप समाधान वाटले. मॉस्को व लेनिनग्राडची ट्रिपही कल्पनातीत आनंद देऊन गेली आणि भलेबुरे अनुभवही आले.

'आव्हान म्हटल्यावर लढायचं' अशा स्वभावामुळे लेखिकेला भारतीय पदार्थ करायची संधी मिळाली आणि ती त्यांनी लीलया पेलली. त्यासाठी सुरुवातीला खूप कष्ट करावे लागले. २-३ महिन्यांच्या पूर्वतयारीनंतर संपूर्ण तयारीनिशी लेखिकेने क्लासेस घ्यायला सुरुवात केली. पदार्थांची रंगसंगती आणि आकर्षकपणा ह्या सगळ्यांचा विचार केला. ते क्लासेस खूपच लोकप्रिय झाले. जर्मन लोक घरी जाऊन पदार्थ करूनही बघू लागले. 'हाम्बुर्ग' रेडिओस्टेशनवर लेखिकेची मुलाखत झाली. तसेच त्यांनी 'माझा आवडता पदार्थ' असे शीर्षक असलेल्या पुस्तकात लेखिकेचा उल्लेखही केला. २८ वर्षे त्यांनी हे क्लासेस घेतले. त्या



अनुक्रमणिका

लोकांना भारतीय पदार्थ खूप आवडतात हे बघून त्यांना आनंद झाला. त्या निमित्ताने लेखिकेची जर्मन समाजाशी ओळख झाली. त्यांचे रीतिरिवाज समजून घेता आले.

तिथले आणखी एक वेगळेपण लेखिकेला जाणवले ते म्हणजे ते लोक कब्रस्तानात फिरायला जातात. आपल्या नातेवाईकांच्या थडग्याजवळ सुंदर फुलझाडे लावून त्यांची निगा राखतात. कॉलेजचे तरुण-तरुणी अभ्यासाला जातात.

लेखिकेने 'ऑडिऑलॉजी' ह्या विषयात भारतात शिक्षण घेतले होते. त्याचा जर्मनीत उपयोग व्हावा ह्या उद्देशाने खूप खटपट केली. वर्क परमिट मिळण्यासाठी दीड वर्ष लेखिकेला झटावे लागले. शेवटी ते मिळालं ते दोन महिन्यांपुरतेच! त्यासाठी त्यांना तिथल्या काही लोकांनी सुचविले की, दोन महिने काम कर व नंतर बेकारांना मिळतो तो हप्ता दर महिन्याला मिळेल. पण स्वाभिमानी निरूपमाताईंना काम न करता लाचारासारखा भत्ता घ्यायचा नव्हता. कारण त्यांना समाजासाठी काम करण्यात 'इंटरेस्ट' होता. म्हणून शेवटी लेखिका हळहळते व उद्वेगाने म्हणते - "जर्मनीत बिदागी न घेता सदिच्छेने-सामाजिक कार्य म्हणून अशा प्रकारचे शिक्षणाचे काम करण्यासही कागदी परवानगी लागते." (पान १०८)

भारतातल्या 'कास्टसिस्टीम' (जातिभेद) बद्दल सगळ्या जगभर बोलले जाते. पण जर्मनीत श्रीमंत, गरीब आणि व्यवसायातील भेदांवरून उच्चनीचता ठरविली जाते. हे जेव्हा लेखिकेने अनुभवलं तेव्हा त्यांनी निर्भीडपणे जाब विचारला, "भारतातल्या कास्ट सिस्टीमबद्दल तुम्ही मला प्रश्न विचारता, पण तुमच्या समाजात क्लासिस्टीम किती कडकपणे पाळली जाते ह्याचा विचार करा- (पान १९०)" असे सांगून त्यांनी त्यांच्याकडील सद्यस्थिती त्यांना कबूल करायला लावली.

१९८१ ते २००१ ह्या काळात टूरिस्ट ऑफिसच्या स्टॉलची जबाबदारी निरूपमाताईकडे होती. तेथे त्या भारतातल्या टूरिझमचा प्रसार करत होत्या. त्या अनुभवावरूनच साकार झाली त्यांची स्वत:ची 'मयूर ट्रॅव्हल एजन्सी' त्यामार्फत जर्मन पर्यटकांना घेऊन त्या भारताच्या सफरी घडवतात. भारताच्या खेडेगावातल्या लोकांच्या आतिथ्याचा प्रत्यय आल्यावर जर्मन लोक भारावून जात असत. स्वत:ला कमी पडले तरी चालेल, पण पाहुण्यांना खाऊ घालणे ह्या खेडवळ लोकांच्या वृत्ती बघून 'हे लोक खरे श्रीमंत, मनाची श्रीमंती आहे' असे जर्मन लोकांनी उद्गार काढले. लेखिकेच्या भारताच्या ट्रिपला खूप प्रसिद्धी मिळाली. रेडिओवर मुलाखती झाल्या. 'भारतात कुठेतरी ताजमहाल आहे. गरिबी आहे, घाण आहे. पण इतर देशांपेक्षा वेगळा देश आहे.' असे जर्मन लोकांनी कुठेतरी वाचलेले असते. पण प्रत्यक्षात भारतातल्या सगळ्या सहली त्या लोकांना आवडल्या. जर्मन, स्विस, ऑस्ट्रियन लोकांना लेखिकेने अभिमानाने भारत दाखविला. प्रत्येक प्रवासाच्या वेळी बरेवाईट अनुभव आले. प्रवासात अनेक विक्षिप्त, हट्टी लोक भेटले. त्यांना कधी सांगून, समजावून, रागावून लेखिकेने प्रत्येक प्रवास प्रवाशांसाठी अविस्मरणीय असा केला. काही वेळा ते लोक भारत बघायला दोनदा येत असत.

पूर्व व पश्चिम जर्मनीतील भिंत तोडली त्यावेळच्या राजकीय परिस्थितीचे वर्णन संगतवार केले आहे.

हिटलरबद्दल दोन्ही बाजूंची मते आज जर्मनीत ऐकायला मिळतात. कोणाला तो देव वाटतो, तर कोणाला सैतान! लेखिका म्हणते हिटलरबरोबर नाझीझम नष्ट झाला अशी जगात कल्पना आहे. मात्र सत्यस्थिती

अशी आहे की, ज्याला 'नीओ-नाझिझम' म्हणतात तो आजही तिथे अस्तित्वात आहे.'' (पान १६९) जर्मन लोकांना त्यांच्या बाहेरील देशातील जे लोक जर्मनीत राहातात त्यांच्याबद्दल राग व द्वेष असतो. वेळप्रसंगी खून व मारामाऱ्याही होतात. विशेषत: टर्की, इटली, युगोस्लोव्हिया येथे आणि जर्मनीत आलेले जर्मन सरकारच्या पैशांवर जगणारे निर्वासित, तसेच व्हिएतनामी, पाकिस्तानी, बांगलादेशी, श्रीलंकन लोकांवर त्यांचा राग असतो.

अशा एक ना दोन अनेक आठवणींचा खजिनाच ह्या पुस्तकात सापडतो. अनुभवांची रेलचेल आहे. मलपृष्ठावर लिहिल्याप्रमाणे एकाच व्यक्तीच्या आयुष्यातला अनुभवांचा हा प्रचंड साठा वाचून वाचक थक्क होतात. जर्मनीचे सर्वांगीण दर्शन येथे घडविले आहे. वर्णने वाचताना वाचक गुंगून जातो.

पुस्तक वाचत असताना लेखिकेचे व्यक्तिमत्त्वही उलगडत गेले आहे. परकीय संस्कृतीशी समरस होताना स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाचा विलय न करता त्यांनी स्वत्व टिकवून ठेवणे ही जिद्द वाखणण्यासारखी आहे. एखादी गोष्ट करायची असे ठरविल्यावर हाती घेतलेले काम उत्तमच व्हायला पाहिजे म्हणून वाटेल तितके कष्ट करण्याची तयारीही लेखिकेने केली. म्हणून ज्यात हात घालेल तिथे ती यशस्वी ठरली, व्यवस्थापन हा गुणही लेखिकेच्या अंगी आहे; हे अनेक ठिकाणी दिसून येते. विशेषत: सहल ठरविताना नियोजनपूर्वक व्यवस्थापन केल्याने त्या सर्व सहली यशस्वी ठरल्या. जिथे गेल्या तिथे त्यांनी आपुलकी आणि जिव्हाळा निर्माण केला. नियती जिथे नेईल तिथे जीव ओतून काम केले.

गेली कित्येक वर्षे सोनळकर पति-पत्नी जर्मनीतून भारतात येऊन जवळजवळ प्रत्येक मराठी साहित्य-संमेलनाला हजेरी लावीत असत. निवृत्तिनंतरचे आयुष्य मायदेशात व्यतीत करायचे असे ठरवून मोठ्या उमेदीने पति-पत्नी भारतात आले. पती अतुल यांच्या सांगण्यावरून ३५ वर्षांच्या आठवणी कागदावर उतरवल्या. त्यांच्या प्रोत्साहनाने व मदतीने लेखन पूर्ण केले. पण नियतीच्या मनात काही वेगळेच होते. लिहून पूर्ण झाल्यावर दोन आठवड्यांनी हृदयविकाराच्या झटक्याने श्री. अतुल सोनळकर यांना देवाज्ञा झाली. ''जीवनात ही घडी अशीच राहू दे'' अशी देवाकडे प्रार्थना करणाऱ्या निरूपमाताईंच्या जीवनाची घडी मात्र विस्कटली. ही एक दु:खाची छाया सोडल्यास संपूर्ण पुस्तक वाचकाला काही शिकवून जाते.

'शोभा प्रधान' यांनी चितारलेले मुखपृष्ठही पुस्तकाला साजेसे आहे. 'जर्मनी' या देशात विविध अंगांनी फुलारलेले निरूपमाताईंचे जीवन अगणित फांद्यांनी डवरलेल्या वेलीद्वारे त्यांना सुचवायचे असावे असे वाटते.

अशारीतीने निरूपमाताईंनी केलेली ही आठवणींची स्वैर भटकंती वाचकाला नवी उमेद देते.



**पुस्तक : आठवणींच्या जगात** (जर्मनीतील तीन तपांचा अनुभव)
*लेखिका :* निरूपमा प्रधान-सोनाळकर, ग्रंथाली प्रकाशन.
*मूल्य :* ३०० रुपये.
*पृष्ठसंख्या :* २६५.

**श्रीमती कुमुद गाडगीळ**
आय-१, मंत्री पार्क, तेजसनगर, कोथरुड,
पुणे ४११०३८.
फोन : ०२०/२५३८४७९९
मो. ९६३७८१९५६५.

**सत्तर वर्षापूर्वीची छंदचर्चा आणि समीक्षा**

## पद्य मीमांसा — वि. ज. सहस्रबुद्धे

– समीक्षक श्री. ना. बनहट्टी

*[ 'पद्यमीमांसा' हे छंदशास्त्रावरील मूलभत घटकांची चर्चा करणारे पुस्तक सांगली (मिरज) येथील साहित्यिक आणि सामाजिक कार्यकर्ते – वि.ज. सहस्रबुद्धे यांनी सुमारे ७०-७१ वर्षापूर्वी लिहिलेले आहे. कवी माधव ज्यूलियन तथा मराठी आणि फारसीचे प्रा.मा.त्र्यं. पटवर्धन ह्यांनी 'मराठी छंदोरचना' हा ग्रंथ लिहून अक्षरगणवृत्त आणि मात्रा गणवृत्ताची चर्चा करताना कवितेचे लयतत्त्व प्रथमत: मांडले. 'लयतत्त्वाचे आवर्तन' हाच गण समजावा, कारण शेवटी लयबद्ध पदरचना हेच पद्य होय आणि Rhythm (साघात-निराघात अवयवयांचा आकृतीबंध) हाच गण मानावा. ही इंग्रजी साहित्यातील लयकल्पना प्रा.मा.त्र्यं. पटवर्धन यांनी मांडली. त्यातील दोष दाखवून प्रतिवाद करण्यासाठी छंदशास्त्राचे अभ्यासक वि.ज. सहस्रबुद्धे यांनी 'पद्यमीमांसा' हा ग्रंथ लिहिला. त्याची चर्चा आपण करण्यापेक्षा, ह्या ग्रंथाची समीक्षा १९४१ सालीच ज्यांनी केली, त्या प्रा.श्री.ना. बनहट्टी यांच्या प्रस्तावनेलाच बीजचर्चा म्हणून वाचकांसमोर ठेवावी; यासाठी त्याला ह्या म.सा. पत्रिकेच्या मार्च २०१४ च्या अंकात परीक्षण म्हणून प्रसिद्धी दिली आहे. छंदोरचनेबाबत हे विवेचन अलिकडच्या काळातील गीतरचनाकारांना दिशा देणारे आहे. अर्थात प्रा. श्री.ना. बनहट्टी यांच्या प्रस्तावनेवरही नंतर उलटसुलट चर्चा झाली आहे. तरीही प्रा. बनहट्टींचे मुद्दे आजही मार्गदर्शक आहेत. पद्याला गद्यापासून वेगळे करणारी ही चर्चा, तसेच लय-ताल-चर्चा, सुरेलपणानुसार वृत्तांचा लगतक्रम (लघु-गुरूक्रम) व यति ह्या पद्याच्या शरीरशास्त्राचा विचार परत एकदा तपासून पाहावा; म्हणून हा लेखनप्रपंच वाचकांसमोर!*

*– संपादक]*

---

But it was soon evident that no such simple formula was possible, that metrists have assumed a degree of homogeneity which is not actually found, that there was more complexity than their generalisations would lead me to expect, that there is an underlying law, but something at once less rigid and more comprehensive than any they had yet stated.

-Egertpm Smith

(Principles of English metre - Preface)

श्री. वि. ज. ऊर्फ तात्याबुवा सहस्रबुद्धे यांच्या छंदोविषयक लेखांच्या संग्रहाला प्रस्तावना लिहिण्याला मी काहीशा हौसेने; परंतु बऱ्याचशा संकोचाने तयार झालो. हौस वाटली ती एवढ्याकरितां की, या विषयावरील माझे विचार व्यक्त करण्याची आजवर कधीच न मिळालेली संधी या निमित्ताने थोडी तरी मिळाली. परंतु हौसेपेक्षा संकोचाची भावना काही काळ तरी बलवत्तर झाली, ती दोन कारणास्तव. संकोचाचे एक कारण हे की ज्यांच्या





अनुक्रमणिका

कृतीसंबंधी या प्रस्तावनेत लिहिण्याचा प्रसंग येणार ते डॉ. माधवराव पटवर्धन निधन पावलेले आहेत. ते आज जिवंत असते तर प्रस्तुत लेखकाला हे चार शब्द लिहिताना अतिशय आनंद वाटला असता. परंतु तसा योगायोग नव्हता, त्यास उपाय नाही. ते गेले असले, तरी त्यांची मतें त्यांचें परीक्षण झालेंच पाहिजे. ज्ञानाची प्रगती इच्छिणाऱ्याने आपणास जे सत्य व यथार्थ वाटते ते पुढे मांडण्यात कचरता कामा नये. व्यक्तीच्या शोचनीय मृत्यूमुळे वाटणारा संकोच बाजूस ठेवणें हेच त्याचे अशा प्रसंगी कर्तव्य होय.

संकोच वाटण्याचे दुसरें कारण, प्रस्तुत लेखकाचा असल्या विषयावर लिहिण्याचा अधिकार काय असा प्रश्न वाचकांकडून उपस्थित केला जाईल. हें होय. ज्याने जन्मांत कवितेची एक ओळही लिहिलेली नाही, दुसऱ्यांनी लिहिलेल्या कवितेची एकही ओळ कधी कोणास म्हणून दाखविली नाही, अशा माणसाने छंद:शास्त्रीय विवेचनांत ढवळाढवळ करावी, हा अव्यापारेषु व्यापार होय, असे कोणासही वाटण्याचा संभव आहे. यावर प्रस्तुत लेखकाची कैफियत एवढीच की, त्याने छंदोरचना जरी केलेली नसली तरी छंदाचे आस्वादन पुरत्या छंदिष्टपणाने केलेले आहे. तो काव्यगायक नसला तरी काव्यश्रावक खास आहे, त्याच्या कानाला सुरेलहबेसूर, सतालहबेताल यांचे ज्ञान होण्याइतपत विवेचक शक्ती ब्रह्मदेवाने दिली असण्याचा संभव आहे. असें वाचकांनी मानून चालण्यास हरकत दिसत नाही. आतापर्यंत मराठीत पद्यरचनेवर आणि छन्दावर लिहिणारे सर्व लोक कवीच होते व आहेत, यामुळे छंद:शास्त्र हें मुख्यत: या कवींच्या उपयोगाचे शास्त्र नसून काव्यवाचकांच्या उपयोगाचे शास्त्र आहे ही मूलभूत गोष्ट आपण विसरतों. सोनाराने कान टोचावे, त्याप्रमाणे एका इंग्रज लेखकाचा यासंबंधीचा उतारा दाखल केल्याशिवाय आमच्या महाराष्ट्रीय वाचकांना कदाचित् ही गोष्ट पटणारही नाही, यास्तव तो उतारा येथे देतो.

"It is clear then that the function of prosody is not to serve the poet. As a guide to composition it is unnecessary to him and useless to others... Most of us however, approach poetry, not as makers, but as readers. And it is with the reader that the function of prosody lies, as an aid to criticism, and to the keener enjoyment of exact appreciation." - Enid Hamer (The Metres of English Poetry Preface.)

आता प्रस्तुत लेखकांसारख्याने छंदोविषयक विचारात मन घालणे हा केवळ अव्यापारेषु व्यापार नसून ती योग्य अशीच गोष्ट आहे, हे वाचकांना खात्रीने पटेल!

प्रस्तुत पुस्तकात संगृहीत करण्यात आलेल्या लेखांपैकी बरेचसे लेख नियतकालिकांमधून प्रथम प्रसिद्ध झाले, त्याच वेळीं मी वाचले होते, व त्यांतील विचारसणी मला पसंत होती. किंबहुना हे लेख लिहिले जात असतांना, श्री. सहस्रबुद्धे व ज्यांचा या पुस्तकांतील लेखांत अनेकवार नामनिर्देश झाला आहे ते श्री. गोविंदराव खासगीवाले, यांच्याशीं प्रस्तुत लेखकाची अनेकवार चर्चाही झाली होती. 'छन्दोरचने'ची दुसरी आवृत्ति त्यावेळीं नुकतीच प्रसिद्ध झालेली होती, तिच्यांतील विषयावर आम्हां तिघांमध्ये विचारविनिमय होऊन असाही संकेत ठरला होता की, 'छन्दोरचने'वर मी एक सविस्तर व मूलगामी परीक्षण लिहावें. परंतु कार्यव्याप्तत्वामुळें तो विचार कृतींत उतरणें लांबणीवर पडत गेले. पुढे माधवरावही गेले, तेव्हा मनास खिन्नता येऊन त्याने हा विषय बाजूस सारून दिला. त्यालाही



अनुक्रमणिका

काही काळ लोटल्यानंतर तात्याबुवांनी आपल्या लेखांचा संग्रह मुद्रित करण्याचा अत्यंत प्रशंसनीय संकल्प योजून त्यासाठी प्रस्तावनेची मागणी केली, तेव्हा पुन: या विषयांतील कुतूहल जागृत होऊन मी ती मागणी मान्य केली. त्यानंतरही मजकडून कित्येक महिने चालढकल झाली. परंतु तात्याबुवांची चिकाटी दांडगी, खेरीज माझी प्रस्तावना न मिळाल्यास पुस्तकाचे प्रकाशन होणे अशक्य होईल, असा पेचप्रसंगही त्यांनी मजसमोर उभा केला. इतक्यावर गोष्ट आली, तेव्हा पराणी टोचावी त्याप्रमाणे मनाची स्थिती होऊन तें कामास लागले.

छंद:शास्त्रावर माधवराव पटवर्धनांचे एवढे लिखाण असतां व इतरही बरेच लोक अलीकडे त्यावर लिहू लागले असतां, सहस्रबुद्धे यांच्या या लेखाचे विशेष महत्व ते काय? ते एकत्र करून पुस्तकरूपाने प्रसिद्ध करणें ही त्यांच्या वैयक्तिक हौसेची गोष्ट होय, इतरांना त्याचे काय? असे कोणासही वाटण्याचा संभव आहे. परंतु माधवराव पटवर्धनांचे छंद:शास्त्रावर एवढे थोरलें लिखाण आहे व इतर छंद:शास्त्रावरील लेखक त्या लिखाणाच्या आधाराने चालतात, म्हणूनच सहस्रबुद्धे यांचे हे लेख प्रसिद्ध होणे इष्ट आहे, नव्हे अत्यंत जरुरीचे आहे, असें मी म्हणतो. दांडगे परिश्रम करून छंद:शास्त्राचें नियमन करण्याचा मोठा प्रयत्न माधवराव पटवर्धन यांनी केला खरा, परंतु शास्त्रीय दृष्टी व आत्मचिकित्सेची वृत्ति यांची मिळावी तशी जोड त्यांच्या परिश्रमक्षमतेस न मिळाल्याकारणाने या क्षेत्रात भ्रामक विचारांचा घोटाळा माजविण्यास त्यांचे लिखाण कारणीभूत झाले आहे असे म्हणणे भाग पडते. माधवरावांचे अंत:करण कवीचे होते. एखाद्या कल्पनेच्या आहारी ते गेले की तिने ते भारल्यागत होत व चिकित्सावृत्ति त्यांच्या मनात राहावी तितकी जागरूक राहात नसे. हा गुण काव्याला जितका उपकारक तितकाच शास्त्रीय विचारास अपकारक होय. परंतु आपल्या प्रकृतीनुसार नुसते काव्य करूनच न थांबता शास्त्रज्ञ, पंडित, स्वतंत्रविचारनिर्माता म्हणून आपण पुढे यावे अशी महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनात प्रादुर्भूत झाली. त्या महत्त्वाकांक्षेची जी फळे लोकांपुढे आली ती दुर्दैवाने काव्याइतकी आल्हाददायक ठरली नाहीत.

छन्द:शास्त्राच्या विचारांत माधवराव ज्या एका कल्पनेच्या आहारी गेले आहेत, ती कल्पना त्यांनी 'पद्य', 'छन्द' या शब्दांच्या ज्या व्याख्या दिल्या आहेत, त्यावरून आपणास प्रतीत होते. पिंगलाचार्यांसारख्या प्राचीन शास्त्रकारांनी केलेल्या धरसोडी (१)चे उद्घाटन करणाऱ्या माधवरावांनी या मूलभूत घटकांच्या व्याख्या देताना कमालीची धरसोड करावी, हें किती चमत्कारिक! 'पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय' (पृ. २) असें माधवराव आपल्या ग्रंथाच्या प्रारंभी म्हणतात. पुढें 'छन्द म्हणजे अक्षरांची तालबद्ध जुळणी होय.' अशी व्याख्या देतात. (येथे छन्द हा शब्द त्यांनी पुढे केलेल्या संकुचित अर्थाने न वापरतां पद्यरचनापद्धति या व्यापक अर्थाने वापरलेला दिसतो.) त्यानंतर पृ. १६ वर 'पद्य म्हणजे लयवद्ध पदरचना' असें माधवराव आणखी एकवार लक्षण देतात. या तिसऱ्या लक्षणांतून काय अर्थ निष्पन्न होतो हा मोठा प्रश्नच आहे! कदाचित् येथें 'पदरचना' याऐवजी 'पद्यरचना' असा शब्द मुद्रणदोषाने पडला असेल! तसें मानलें तरी घोटाळा नाहीसा होत नाहीच. पहिली व्याख्या धरून चालण्यास प्रत्येक तराण्याला किंवा 'लला ललाला, लला ललाला' अशा अर्थशून्य परंतु 'लयबद्ध' अक्षररचनेस पद्य म्हणण्याचा प्रसंग येतो! दुसऱ्या व्याख्येंत हा दोष आहेच; शिवाय 'लय' या शब्दाच्या ऐवजी 'ताल' हा शब्द वापरून एक निराळाच घोटाळा निर्माण केला आहे. 'लय' म्हणजे काय व 'ताल म्हणजे काय?' दोन्ही शब्दांचा अर्थ एकच असेल तर भिन्न



अनुक्रमणिका

शब्द योजून शास्त्रीय विचारांत न खपणारें गौरव कां पतकरिलें? अर्थ भिन्न असेल तर दोहोंपैकी कोणती तरी एक व्याक्या चुकीची ठरणार. तिसऱ्या व्याख्येंत 'अक्षर' या ऐवजी 'पद्य' (पद?) हा शब्द घातलेला दिसतो. परंतु पद्य (पद?) याचा अर्थ कोठेच स्पष्ट केलेला नाही.

शास्त्रास मूलभूत अशा घटकांची 'छंदोरचनें'तील लक्षणें पाहिली तर त्यांची ही दशा! मग एकंदर पुस्तकांतील विवेचनात किती अशास्त्रीयता व तर्कदुष्टता भरलेली असेल याची कल्पनाच केलेली बरी! परंतु असें तपशीलवार निरीक्षण येथे करण्याचा हेतु नाही. ज्या एका कल्पनेच्या आहारी गेल्यामुळे माधवरावांचे विवेचन मूलतःच अशास्त्रीय व अलक्ष्यवेधी झालें आहे, तिचा उल्लेख करून तिजमुळे झालेले अनिष्ट परिणाम वाचकांच्या निदर्शनास आणून दिल्याने माझें काम भागणारें आहे. कारण त्या योगानेच सहस्त्रबुद्धे यांनी प्रस्तुत लेख लिहून जी कामगिरी बजावली आहे तिचें महत्त्व वाचकांच्या लक्षात येईल.

माधवरावांच्या सर्व विवेचनास व्यापणारी, त्यांनी रचिलेल्या सर्व सांगाड्यास प्राणभूत अशी कल्पना म्हणजे 'सर्व मराठी कविता लयबद्ध आहे' ही होय. हाच आपण शोधून काढलेला महान सिद्धांत असें ते समजतात. हे तत्त्व पूर्वीच्या कोणत्याही (एक अस्फुट अपवाद खेरीज करून) शास्त्रकारास सुचलें नसून तें मीच स्वतंत्रपणे शोधून काढलें असे बजावण्यास ते कमी करीत नाहीत.

ज्या आपल्या सिद्धान्ताचा एवढा बडेजाव त्यांनी केला आहे, त्यांतील मुद्याचा शब्द जो 'लय' त्याचा अर्थ ते काय करितात हें पाहूं गेलें असतां वाचकांच्या पदरी निराशाच येते. कारण 'लय म्हणजे काय?' या मथळ्याखाली पृ. १६ ते २० पर्यंत जो मजकूर त्यांनी लिहिला आहे त्यांत 'लय' या शब्दाचे स्पष्ट व रेखीव असें लक्षण त्यांनी दिलेले नाही. 'लय' म्हणजे 'चाल' नव्हे, तर लय म्हणजे टाळीच्या योगाने पद्यास येणारी विभागात्मकता, असा त्यांच्या एकंदर प्रतिपादनाचा आशय दिसतो. अर्थात् लय म्हणजे पद्यामधील समकालिक विभाग पुन:पुन: आवृत्त होण्याचा धर्म, किंवा थोडक्यात म्हणायाचे झाल्यास 'आवर्तनात्मकता' असें म्हटल्यास चालेल.

हा लयबद्धतेचा सिद्धान्त मला स्वतंत्रपणें सुचला, असें पटवर्धन सांगतात. (पृ. ५६३) तथापि 'छन्दोरचने'ची इंग्रजी प्रस्तावना पाहिली व त्यांत वापरलेला 'Rhythm' हा शब्द पहिला की या 'लय' शब्दाचें मूळ लक्षांत येतें. 'Rhythm' च्या कल्पनेचा अभावितपणे माधवरावांच्या मनावर परिणाम होऊन अबोधपूर्व (unconscious) मानसिक प्रक्रियेने त्यांस 'लयी'ची कल्पना सुचली असावी.

इंग्रजी छन्दःशास्त्रांतील 'Rhythm' ची कल्पना मुख्यत्वेंकरून आघाता (accent) वर आधारलेली आहे. 'साघात व निराघात किंवा लघु व गुरू अशा उच्चारविभागांची नियमित व सममात्रक आवृत्ती' अशा आशयाची 'Rhythm' या शब्दाची व्याख्या इंग्रजी भाषेच्या आक्सफोर्ड बृहत्कोशांत दिलेली आढळते. *ही व्याख्या अगदी सामान्य व व्यापक आहे. यापैकी 'साघात व निराघात विभागांची आवृत्ती' हा भाग इंग्रजी छंदांस लागू पडणारा आहे. मराठींत असे आघात नाहीत. गद्यांत आघात किंचित् भासमान होत असले तरी पद्यांत ते मुळीच दृग्गोचर होत नाहीत. तेव्हा मराठी छंदःशास्त्रांत 'Rhythm' ची कल्पना आणावयाची म्हटल्यावर आघाताची बाजू

---

* ही व्याख्या मुळांत येणेंप्रमाणे आहे.
'The measured recurrence of arsis and thesis determined by vowel quantity or stress or both combined'

सोडून देऊन लघुगुरू उच्चारांची समप्रमाण आवृत्ती एवढाच अर्थ घेणें भाग झालें; आणि हाच अर्थ 'लय'चें तत्त्व मराठी छंद:शास्त्राच्या मानगुटीवर बसविण्यात आलें.

अशा रीतीने इंग्रजीतील काही विशिष्ट कल्पना आपल्या इकडील शास्त्रांत विशिष्ट अर्थाने योजिलेल्या शब्दांवर लादणें कितपत उचित होय, हा मोठा प्रश्न आहे. 'लय' व 'ताल' हे आपल्या संगीतशास्त्रांतील पारिभाषिक शब्द आहेत. पटवर्धन आपल्या छन्दोरचनेंत हे दोन्ही शब्द वापरतात आणि दोन्हीही जवळजवळ एकाच अर्थी, म्हणजे 'Rhythm' या अर्थी वापरतात. असें दिसते. यामुळे दुहेरी दोष उत्पन्न झाला आहे. दोन संज्ञा काही कारण नसताना एकाच अर्थी वापरणें व त्यांचे नीटसें स्पष्टीकरण न करणें हे मुळात अशास्त्रीय होय. असला घोटाळा 'मुक्तछन्दा'चे प्रणेते श्री. आ. रा. देशपांडे यांनी केलेला नाही. ते ताल हा एकच शब्द वापरतात, आणि तो 'Rhythm' या अर्थी वापरतात. परंतु विशिष्ट पारिभाषिक अर्थाने शास्त्रांत पूर्वीपासून रूढ असलेली संज्ञा निराळाच स्वकल्पित अर्थ दर्शविण्याकरितां वापरणे हे बरें नव्हे. 'लय' व 'ताल' या शब्दांना संगीत शास्त्रानुसार विशिष्ट ठरीव अर्थ आहेत व त्या अर्थांनी त्यांचा आज घटकेस सर्रास प्रयोगही होत असतो. तेव्हा हे शब्द निराळाच काही इंग्रजीतून घेतलेला अर्थ व्यक्त करण्याकरिता वापरल्याने सर्व घोटाळा माजून एकाचे म्हणणे काय, हेंच दुसऱ्यास समजूं नये असा अनवस्था प्रसंग उत्पन्न होईल. सहस्रबुद्धे यांनी हा घोटाळा उघडकीस आणून तो न करण्याबद्दल जो इशारा दिला आहे तो अगदी प्रसंगोचित आहे.

असो! 'सर्व पद्य 'लयबद्ध' असतें' हा जो पटवर्धनांचा आवडता सिद्धांत, त्याचा उगम वर दर्शविल्याप्रमाणे इंग्रजी छंद:शास्त्रामधील 'Rhythm' च्या कल्पनेत असलेला आपणास आढळतो. कसेंहि असो, हा सिद्धांत गृहीत धरून तो मराठीतील सर्व वृत्तजातिछंदांस लावूं पाहण्याचा जबरदस्तीचा खटाटोप केल्याकारणाने पटवर्धनांचे विवेचन अथपासून इतिपर्यंत अशास्त्रीय पायावर उभारल्यासारखे झाले आहे. शास्त्र हे केव्हाही प्रत्यक्षानुगामी असलें पाहिजे. उदाहरणे अथवा घटना तपासून त्यावरून सामान्य नियम काढणें (Inductive Method) ही शास्त्ररचनेची खरी पद्धत होय. पटवर्धनांनी याच्या उलट जी सिद्धान्तानुसारी किंवा आदर्शानुगामी (deductive) पद्धत, तिचा अवलंब केला आहे. विशिष्ट स्वरूपाचा 'लय' सिद्धान्त अगोदर गृहीत धरून तो सर्व वृत्त जाति छन्दांना लावून दाखविण्याच्या खटाटोपात ते पडले आहेत. त्यामुळे पटवर्धनांचे एकंदर प्रतिपादन ज्या पिंगलाचे ते वाभाडे काढतात, त्याच्या मानाने अधिक अशास्त्रीय झालें आहे. पिंगलाने पटवर्धनांप्रमाणे स्वतंत्र सिद्धान्ताचे 'शोध' लावले नसतील; पण तो बिचारा प्रत्यक्षानुगामी पद्धतीचें तरी अवलंबन करितो. त्यामुळे त्याने जेवढें काम केलें तेवढें तरी भक्कम झालें आहे. याच्या उलट 'मूलभूत सिद्धान्ताचा स्वतंत्रपणे शोध लावणाऱ्या' पटवर्धनांनी दिलेल्या आर्या, दिण्डी, साकी, भूपतिवैभव यासारख्या अत्यंत महत्त्वाच्या छंदाच्या व्याख्या, अल्पावधीतच चुकीच्या अथवा अपुऱ्या ठरल्या व आपणच एकवार केलेल्या व्याख्या, गुपचूपपणे कां होईना, बदलून पुन: पिंगलाची कास कित्येक ठिकाणी धरण्याची त्यांना पाळी आली.

पटवर्धनांनी आपला 'लय' सिद्धांत प्रत्यक्षानुगामी पद्धतीवरूनच कशावरून बांधला नसावा, अशी शंका कोणी घेतल्यास त्याचे उत्तर अगदी सोपे आहे व ते त्यांच्या ग्रंथांतच आढळणारे आहे. 'पद्य



अनुक्रमणिका

म्हणजे लयबद्ध अक्षररचना' असें लक्षणच बांधून टाकल्यानंतर व लय म्हणजे आवर्तनात्मकता असें स्पष्टीकरण (पृ. १६-१८) केल्यानंतर प्रत्येक पद्यप्रकारात आवर्तनात्मकतेत धर्म असला पाहिजे, अशी कोणीही साहजिक अपेक्षा करील. परंतु पद्यप्रकारांपैकी अत्यंत विस्तृत, लोकप्रिय व प्राचीन असा जो वृत्तविभाग त्याला आवर्तनात्मकतेचा धर्म लागू पडत नाही! खुद्द पटवर्धनांनाही ही गोष्ट, कचरत कां होईना, कबूल करणें भाग पड़लें असून, त्यांनी वृत्तांचा 'अनावर्तनी' असा निराळा विभाग केला आहे. (पृ. ९५-९७) त्यांच्याच मतें अनावर्तनी विभागात पुढील वृत्ते येतात.

इन्द्रवज्रा, उपेन्द्रवज्रा, इन्द्रवंशा, वंशस्थ, रुचिरा, प्रहर्षिणी, रथोद्धता, स्वागता, प्रमिताक्षरा, द्रुतविलम्बित, वसन्ततिलका, शालिनी, मालिनी, मन्दाक्रान्ता, स्रग्धरा, शार्दूलविक्रीडीत, हरिणी, शिखरिणी, सुवदना, पृथ्वी.

आणि आवर्तनी वृत्तांत कोणती अंतर्भूत होतात हे पहा.

तोटक, विद्युन्माला, दोघक, जलोद्धतगति, जलधरभाला, मत्तमयूर, मदिरा, हंसगति, हेमकला, विबुधप्रिया, सुरनिम्नगा, प्रमाणिका, कलिन्दनन्दिनी, देवराज, भुजङ्प्रयात, स्त्रग्विणी, मन्दारमाला, अमृतध्वनि.

मराठीतील अक्षरगणवृत्तांशी ज्याचा परिचय आहे, अशा कोणीही वरीलपैकी अनावर्तनी वृत्तांचा प्रचार मराठींत जास्त यांनी आणिला आहे. छंदांतील अक्षरें नियत असतात व तुम्ही प्रत्येक अक्षरास गुरू ठरवून त्यांचा लगक्रमही एकप्रकारे निश्चित करतां, तेव्हा छंद हा अक्षरगणवृत्तांचाच एक प्रकार कां मानू नये, त्यांचा स्वतंत्र प्रकार मानण्याचें कारण काय? असा सवाल श्री. जोशी करतात. जोशी हे पटवर्धनांचे मोठे चहाते असूनही त्यांच्या लक्षांत पटवर्धनांची या बाबतीतली तर्कदुष्टता आली, ही गोष्ट अभिनंदनीय होय. श्री. सहस्त्रबुद्धे यांनी अर्थात जोशींना उत्तर दिलें आहे व तें 'छंदांतील प्रत्येक अक्षर गुरू मानणें हें मुळांतच चूक आहे.' रास्त मतावर आधारलेलें असल्या कारणानें योग्य दिशा दर्शविणारें झालें आहे.

स्वकपोलकल्पित आवर्तनसिद्धान्ताच्या आहारी गेल्यामुळे पटवर्धनांनी पूर्वाचार्यांनी कल्पिलेले अक्षरगण व मात्रागण अव्हेरिले आहेत. गणांसंबंधी समाधानकारक विवेचन त्यांनी कोठेच केलेले नाही. आपल्या आवर्तन कल्पनेस अनुसरून तालाचे एक आवर्तन म्हणजेच एक गण अशी त्यांनी कल्पना केलेली दिसते व या कल्पनेनुसार अष्टमात्रक, सप्तमात्रक, षण्मात्रक व पंचमात्रक असे गण मानिलेले दिसतात. परंतु आवर्तनानुसार गण मानणें हें अत्यंत अशास्त्रीय आहे. मात्रावृत्तांमध्ये गण कोणते मानावेत या संबंधी सहस्त्रबुद्धे यांनी जो लेख लिहिला आहे, त्यांत या मुद्याचें त्यांनी समर्पक विवेचन केलेलें असून, पूर्वाचार्यांनी मानिलेल्या गणासच आणखी पाच गणांची पुरवणी जोडून एकंदर दहा मात्रागण मानिल्याने सर्व काम कसें भागेल हें उत्कृष्ट रीतीने दर्शविलें आहे. आवर्तनानुसार गण मानण्याची पटवर्धनांची कल्पना अशास्त्रीय आहे, हें पटण्यास फार मोठ्या युक्तिवादाची जरुरी नाही. आवर्तनाचें तत्त्व अगोदर सर्व पद्यप्रकारांस लागू पडत नाही. बहुतेक सर्व प्रचलित अक्षरगणवृत्तें अनावर्तनी आहेत, काही थोडी अक्षरगणवृत्तें व बरीचशी मात्रावृत्तें आवर्तनी आहेत, असें जरी म्हणतां आलें, तरी आवर्तनाचें माप स्थिर नसतें. बरीच आवर्तनी वृत्ते निरनिराळ्या चालींवर म्हणण्यात येतात. चाल बदलली म्हणजे आवर्तनाच्या मात्रा बदलणे संभवनीय असतें. कवितेच्या शब्दरचनेनुसार तिच्या म्हणण्याच्या चालींतही क्वचित फरक पडतो व या फरकानुसार मधले यति, म्हणजे विश्रामाच्या

जागाही बदलतात. दिंडी, साकी, चंद्रकांत, उद्धव, अक्रूर, भूपतिवैभव इत्यादी जाति म्हणावयाच्या तर त्या संगीतशास्त्रोक्त तालावरच म्हटल्या पाहिजेत असा कायदा तर कोणी केलेला नाही व करणें रास्तही होणार नाही. राग व ताल लावून कोणत्याही जातीचें जें गायन करण्यांत येतें, त्याखेरीज गायकी चालींचे मुळीच ज्ञान नसणाऱ्या सामान्य लोकांकडून म्हटली जाणारी राग-ताल-निरपेक्ष अशी चाल त्या जातीला असतेच. असे नसेल तर जातिवृत्तांचा विचार म्हणजे संगीतांतील तालशास्त्राचीच एक शाखा होऊन बसेल. तात्पर्य काय की, छंद:शास्त्रामध्ये जातिवृत्ताची रचना अगर व्याख्या सांगतांना तालाची आवर्तनें सांगणें किंवा आवर्तनांस अनुसरणारा असा यतिविभाग व मात्राविस्तार सांगणें हे छंद:शास्त्राच्या दृष्टीने इष्ट होणार नाही. भाषेतील प्रत्येक वृत्ताला रागताल-निरपेक्ष असा स्वाभाविक सुरेलपणा असतोच व तो सुरेलपणा लक्षात घेऊन त्या वृत्ताचे लक्षण बांधले पाहिजे. हा सुरेलपणा ज्याच्या योगाने साधेल असाच त्या वृत्ताचा लगक्रम व त्यातील यति ठरविण्यात यावे. याचा अर्थ असा नव्हे की, तालाचा विचार सर्वथैव बाजूस सारण्यात यावा. जातीचे लक्षण ठरवितांना तालाचा विचार अवश्य केला पाहिजेच. दिंडीचें लक्षण ठरवितांना तालज्ञानाची किती मदत झाली आहे, हें श्री. खासगीवाले व सहस्त्रबुद्धे यांच्या लेखांवरून स्पष्ट झालेच आहे. जातीचें गण ठरविताना तालाची आवर्तने कशी बसतात, ठेका कोठे येतो वगैरे पाहावें लागेलच. तात्पर्य, त्या त्या जातीची तालबद्ध गाण्याची पद्धत व सामान्य लोकांकडून ती जाति ज्या ज्या पद्धतींनी म्हणण्यात येत असेल त्या सर्व पद्धति लक्षात घेऊन त्यांना बाध येणार नाही अशा रीतीने त्या जातीचे गण व यति ठरविण्यात यावे. आवर्तनें म्हणजेच गण असे मानून आठ मात्रांचा, सात मात्रांचा, सहा मात्रांचा, पाच मात्रांचा असे गण कल्पिणें हे अशास्त्रीय होय. कारण या योगाने लगक्रमाचा मुळीच बोध होत नाही. गण हे वृत्तरचना (वृत्त हा शब्द येथे सामान्य अर्थाने योजना आहे.) बिनचूक व रेखीव रीतीने व्यक्त करण्याचे साधन होय. तें वृत्ते मोजण्याचे एक माप आहे. मापाला जसा निश्चितपणा असणें अवश्य आहे, तसेंच गणाचेही असले पाहिजे. गणकल्पनेच्या बुडाशीं दुसरें कोणतेंच तार्किक तत्व नाही व असण्याची जरुरी नाही. असें काहीतरी तत्व गणकल्पनेच्या बुडाशीं आपण कल्पिलें नाही तर मग आपलें नाविन्य तें काय, असे डॉ. पटवर्धनांच्या मनाने घेतलें असावें. म्हणून आवर्तनें म्हणजे गण असें मानून त्या आधारावर छंद:शास्त्र रचण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. परंतु त्यांना यश आलें असें म्हणवत नाही. प्रत्येक अक्षरगणवृत्ताचें अथवा जातीचें लक्षण केवळ लघुगुरुक्रम लिहून दाखवून सांगणें आणि अशा रीतीने शेंकडो वृत्तांचा अनाकलनीय असा फाकट पसारा मांडून बसणें हे शास्त्र नव्हे. शास्त्र म्हणजे वर्गीकरण व वर्गीकरणोत्तर संकलन होय. वर्गीकरण करण्याला ठरीव प्रमाणाचे माप लागतें. भलत्याच कल्पनेच्या आहारी गेल्याने पटवर्धनांना निश्चित व रेखीव माप निर्माण करतां आले नाही व पूर्वाचार्यांनी निर्मिलेले त्यांनी स्वीकारले नाही.

ही विचारसरणी मान्य झाली म्हणजे गण कोणचे व कसे मानावेत हा प्रश्न सोडविण्याची योग्य दिशा श्री. खासगीवाले व सहस्त्रबुद्धे यांनी दाखविलेली तीच होय, हें कोणासही सहज पटेल, मात्रागण कोणचे मानावेत याविषयी पायाशुद्ध विवेचन करून खासगीवाले व सहस्त्रबुद्धे यांनी छंद:शास्त्राच्या विचारांत मोठी उपयुक्त भर घातली आहे, असें मला निभ्रांत वाटतें.

कोणत्याही पद्यप्रकाराची अक्षरसंख्या (असल्यास)



अनुक्रमणिका

लगक्रम (असल्यास व असेल तेथे, व यति (असल्यास) यांनी नियत अशी रचना नि:संदिग्ध स्वरूपांत सांगणें हेंच छन्द:शास्त्राचे कर्तव्य होय, त्यांतील आवर्तनें, ताल, ठोका इ. ठरवीत बसणें हे नव्हे. पटवर्धनांनी वृत्तरचना सांगण्यास सर्वथैव उपयुक्त असे पिंगलोक्त गण स्वीकारले नाहीत आणि ज्या ताल (लय) सिद्धांताचा त्यांनी अंगीकार केला, त्या सिद्धान्तानुसार संगीतांतील तालविचारही संबंध छन्द:शास्त्रांत आणणे त्यांना जमलें नाही (तें जमणें शक्यच नव्हते.); असा अर्धजरतीय न्याय स्वीकारल्यामुळे पटवर्धनांचे विवेचन पूर्णतया अशास्त्रीय झालें आहे. खरी धरसोड कोणी केली असेल तर ती पिंगलाने नव्हे पटवर्धनांनी!

आपल्या लाडक्या आवर्तनकल्पनेच्या आहारी गेल्यामुळे पटवर्धनांनी गीति (आर्या) या वृत्ताचे लक्षण चुकीचे करून ते करिताना भ्रमोत्पादक विधाने केली आहेत. त्यांचा परामर्श सहस्रबुद्धे यांनी 'गीतीचे लक्षण' या लेखांत फार चांगल्या रीतीने घेतला आहे. दिंडी, साकी, भूपति इत्यादी जातिवृत्ताचे लक्षण करितांना त्यांच्या हातून झालेल्या चुकांवरून शास्त्रीय, रेखीव व बिनचूक व्याख्या करणे हे पटवर्धनांसारख्या कवीचे काम नव्हे, हेंच प्रत्ययास येतें. या अत्यंत महत्वाच्या जातिवृत्तांची लक्षणें बांधताना पटवर्धनांच्या हातून कशी धरसोड झाली आहे, याचे उद्‌घाटन सहस्रबुद्धे यांनी चांगल्या रीतीने केले आहे.

राहतां राहिला एकच विषय : मुक्तछंद. मुक्तछंदाचे एक उत्पादक श्री. आ. रा. देशपांडे यांनी याच छंदांत रचिलेल्या 'भग्नमूर्ति' या काव्याच्या पुस्तकाच्या अखेरीस एक लहानसा निबंध जोडून त्यात मुक्तछन्दाची कैफियत थोडक्यांत, परंतु भारदस्तपणे व समर्पक रीतीने मांडली आहे. प्रस्तुत लेखसंग्रहांत सहस्रबुद्धे याचा जो लेख आहे, त्यांत तिऱ्हाइताच्या दृष्टीने मुक्तछंदाच्या वादाचे अवलोकन तितक्याच भारदस्तपणाने व समंजसपणाने केलेले वाचकांच्या नजरेस येईल. मुक्तछंदाच्या सतालत्वाविषयी सहस्रबुद्धे यांनी घेतलेल्या आक्षेपांत बरेंच तथ्य दिसतें. 'अक्षरछंदांत समाविष्ट होणारा मुक्तछंद खुशाल तयार करावा. परंतु तो तालबद्ध होऊ शकणार नाहीं!' हें त्यांचे म्हणणें विचारणीय आहे. देशपांडे यांच्या म्हणण्याप्रमाणे प्रत्येक अक्षराच्या दोन मात्रा जरी मानल्या (असें मानणें विवाद्य आहेच) तरी प्रत्येक चरणांतील व चरणकांतील मात्रा संख्या अनियमितच राहणार! कारण चरणांत चरणक वाटेल तितके येऊं शकतील व चरणकांत मात्रा १० अगर १२ येऊ शकतील. अर्थात् मुक्तछंदांतील चरण जसे लिहिले जातात तसे तालांत बसणें अशक्य आहे. आपल्या ताल या शब्दाचा अर्थ संगीतोपयोगी ताल हा नसून इंग्रजीतील 'rhythm' शब्दाशीं तो समानार्थक मानावयाचा आहे, असें सांगून देशपांडे यांनी आपली या अडचणींतून सुटका करून घेतली आहे. इंग्रजी कल्पनेच्या आधाराने आपली सुटका करून घेण्यापेक्षा ताल (अथवा पटवर्धनप्रणीत लय) हा शब्दच न वापरतां 'सुरेलपणा' हा किंवा अशाच अर्थाचा शब्द छन्दाचें गद्याहून वैशिष्ट्य दाखविण्याकरीतां योजावा असें मला वाटतें. म्हणजे बराचसा वाद मिटेल.

काव्याचे नवयुग सुरू होण्यास मुक्तछंदाचा स्वीकार होणें जरुरीचें आहे; नवकाव्याचें वाहन होण्यास मुक्तछंदच योग्य आहे,– असें देशपांडे यांनी ठासून प्रतिपादन केलें आहे. या म्हणण्यावर पुष्खळांनी आक्षेप घेतले असून, त्यावर वाद सुरूच आहे. यावर दोन्ही बाजूंनी लिहितां येण्याजोगें आहे, परंतु तसें करण्याचे स्थळ हें नव्हें. इतकें मात्र खरें की, अगोदर कालवा खणून तयार करून नंतर त्यांच्यांतून पाण्याचा पाट सोडतात, त्याप्रमाणे अगोदर मुक्तछंद तयार करून ठेवला की काव्याचे नवयुग त्यामागून



अनुक्रमणिका

धावत येईल, अशी कल्पना करणें अवास्तविक ठरेल. नवयुगप्रेत्या कवीला आपल्या विचारांसाठी नवीन वाहन पाहिजेच असलें तर त्याचा तो नवा छंद निर्माण करील. आधी छंद व त्या मागून काव्याचा नवयुग त्यामागून धावत येईल, अशी कल्पना करणें अवास्तविक ठरेल. नवयुगप्रणेत्या कवीला आपल्या विचारांसाठी नवीन वाहन पाहिजेच असलें तर त्याचा तो नवा छंद निर्माण करील. आधी छंद व त्या मागून काव्याचा नवयुगप्रणेता हा क्रम तितकासा युक्तिसिद्ध वाटत नाही.

कसेंही असो. पटवर्धनांनी मुक्तछंदाविषयी छंदोरचनेंत लिहितांना जी विरोधकांची भूमिका धारण केली आहे, ती तितकीशी योग्य नसून सहस्त्रबुद्धे यांनी दर्शविलेल्या तटस्थवृत्तींत थोडी सानुकूलतेची भर घातल्यास या प्रयत्नाविषयी तिऱ्हाईत रसिकाने कोणती वृत्ति ठेवावी, याचें बरोबर माप सापडेल असें मला वाटतं. मुक्तछन्दाच्या वादाला बाहेरच्यांकडून पोहोचणाऱ्या उपसर्गापेक्षा अंत:स्थ मतभेदामुळे उत्पन्न होणारी अनिश्चितताच अधिक बाधक होत आहे, असें वाटतें. तेव्हा मुक्तछंदवादी कवींनी आपली एक मुक्तछन्द परिषद भरवून आपापसांत पूर्ण एकोपा घडवून आणावा म्हणजे मुक्तछन्दाचा प्रसार द्रुतगतीने होईल!

मुक्तछन्दाच्या वादाचा निरोप घेऊन पुन्हा मुख्य विषयाकडे वळावयाचें म्हटल्यास अखेर इतकेंच सांगणें उरतें की सहस्त्रबुद्धे यांचे या संग्रहांतील लेख पटवर्धनांच्या एकांगी व सदोष प्रतिपादनावर उतारा म्हणून नि:संशय उपयुक्त ठरतील. हे लेख पटवर्धन हयात असतानांच लिहिले आहे. त्यांचा कांहीसा परिणामही झाला असावा, असें पटवर्धनांनी अगदी अखेरीस लिहिलेल्या पद्यप्रकाश नांवाच्या पुस्तकांत आर्या, दिण्डी या छन्दांच्या व्याख्या सहस्त्रबुद्धे यांच्या आशयास अनुकूल अशा रीतीने बदलल्या आहेत, यावरून वाटते. तथापि हे सर्व गुपचूप, सहस्त्रबुद्धे अगर खासगीवाले यांच्या नांवाचा कोठेंही उल्लेख न करितां त्यांनी केलें आहे. इंग्रजी 'rhythm' चाच तोंडवळा असलेला 'लय' सिद्धान्त मराठींत आणण्यांत आला, तथापि संबंध ६०० पानांच्या ग्रंथांत (केवळ इंग्रजी वाचकांकरिता लिहिलेल्या 'Introduction' खेरीज 'rhythm' चा उल्लेख नाही. मग सहस्त्रबुद्धे यांच्यासारख्या गरीब, कोपऱ्यातल्या, पदवीहीन लेखकाचा उल्लेख कसा होईल बरे!

हरकत नाही, पटवर्धनांकडून उल्लेख झाला नसला, तरी जनता सहस्त्रबुद्धे यांच्या प्रयत्नाचें खचित स्वागत करील. पटवर्धनांच्या जाड्या पांडित्याची छाप त्यांच्या मनावर पडलेली आहे अशा विद्वानांनी, कवींनी अगर रसिकांनी हे लेख पूर्वग्रहाने मन कलुषित न होऊ देतां वाचले तर त्यांना त्यात ग्राह्यांश खास दिसून येईल. सहस्त्रबुद्धे यांची विचारसरणी शास्त्रशुद्ध, सावधगिरीची व प्रत्यक्षानुगामी आहे. असा प्रत्यय वाचकांस आल्याखेरीज राहणार नाही. अशाच रीतीने व्यासंग वाढवून मराठीतील पद्य नि पद्य तपासून पाहून 'मराठीचें छन्द:शास्त्र' रचण्याचा त्यांनी खासगीवाले यांच्यासारख्या संगीतज्ञांच्या साहाय्याने प्रयत्न केल्यास ते नमुनेदार आणि अभ्यासू रसिकांस मार्गदर्शक होईल, अशी दृढ आशा वाटते. पटवर्धनांनी आपल्या ग्रंथांतून मांडलेल्या सामग्रीचा व विचारांचा त्यास अमूप उपयोग होईल, यात शंकाच नाही. आणि पटवर्धनांकडून प्राप्त झालेल्या ऋणाचा ते अत्यंत कृतज्ञ मनाने आदरपूर्वक उल्लेख ठायीं ठायीं करतील, याविषयी तर माझ्या मनात तिळमात्र संदेह नाही.

नागपूर
चैत्र शु।। १ शके १८६३ **श्री.ना.बनहट्टी**



अनुक्रमणिका

# सांगली जिल्ह्याची लावणी परंपरा

– प्रा. आबासाहेब शामराव शिंदे

*[सांगली जिल्ह्याचे लावणी वाङ्मयाला लाभलेले योगदान लक्षणीय आहे. लावणीकार, नृत्यांगना आणि संगीत दिग्दर्शक ह्या तीनही घटकांना, सांगली जिल्ह्याचे समृद्ध योगदान आहे. त्याचे दस्तऐवजीकरण प्रा. आबासाहेब शिंदे यांनी केले आहे. फडाची लावणी, बैठकीची लावणी, भेदिक लावणी, चित्रपटातील लावणी, सामाजिक चळवळीची लावणी अशा बहुविध रूपातून सुमारे ३०-३१ लावणीकार, चाळीस तमाशांचे फड, १०-११ नृत्यांगना आणि वसंत पवार, राम कदम, बाळ पळसुले ह्या संगीतकारांनी ही लावणीची लोककला जागविली आहे. त्याचे हे सिंहावलोकन!*
*–संपादक]*

तमाशा ही महाराष्ट्राची अस्सल रांगडी आणि जिवंत लोककला म्हणून नावारूपाला आली. ती केवळ सांगली जिल्ह्यामुळेच. कारण सांगली जिल्ह्यात आज हयातीत चाळीस तमाशाचे फड सध्या कार्यरत आहेत. त्यामध्ये गण-गवळण, रंगबाजी, लावणी आणि वगनाट्य ह्या सादरीकरणाला विशेष महत्त्व आहे. खरं तर लावणीचा विकास झाला तो सांगली जिल्ह्यातील 'भेदिक लावणी' परंपरेतून.

'महाराष्ट्राची शान आणि शृंगाराची खाण' असं जिचं सार्थ वर्णन करण्यात आलं, ती म्हणजे 'लावणी' होय. पेशवाईच्या काळात लावणीला खरा बहर आला. लावणी ठराविक शृंगारात्मक मुद्राभिनयाचं दर्शन घडवीत असली, तरी तो प्रगत नृत्य प्रकारच मानला गेला. म्हणून लावणीचा करमणूकप्रधान बाज चित्रपटाने आत्मसात केला. पण तिचा अस्सल ग्रामीण रासवटपणा तमाशा-पटामध्ये पूर्णांशाने आला नाही. लावणी रुपेरी आहे, तिचे दर्शन लोकनाट्याच्या बोर्डावरून सादर करण्याचा प्रयत्न झाला. लावणी जितकी मोहक तितकीच दाहक, जितकी उच्छृंखल तितकीच सोज्ज्वळ, थेट काळजाला भिडते. ती थिरकली जनसामान्यांचे रंजन करणाऱ्या ढोलकी फडांच्या तमाशातून. सगनभाऊ, प्रभाकर, रामजोशी, होनाजी बाळा, अनंत फंदी, भाऊ फक्कड आदींच्या काव्यावर पंडिती काव्याचा प्रभाव होता. म्हणूनच पारंपरिक मराठी लावणीने सातसमुद्रापलीकडे झेप घेतली.

**मराठी लावणीचा सुवर्णकाळ :**

लावणीचा खरा सुवर्णकाळ सुरू झाला तो उत्तर पेशवाईच्या कालखंडात. याच कालखंडात लावणीला पेशवाई राजवस्त्र लाभले. पण ते राजवस्त्र अंगवस्त्र वाटावे असेच वाटते. लावणी खरी थिरकली ती जनसामान्यांचे रंजन करणाऱ्या ढोलकी फडाच्या तमाशातून. सगनभाऊ, प्रभाकर, राम जोशी, होनाजी बाळा, अनंत फंदी आदींच्या रचनांवर पंडिती काव्यांचे संस्कार होते. या संस्कारांतून आलेली लावणी अलंकार विलसित होती, पण या लावणीत खरे प्राणतत्त्व फुंकले ते पठ्ठे बापूराव, भाऊ फक्कड, दगडूबाबा माळी, अर्जुना वाघोलीकर, हरी वडगावकर आदी रचनाकारांनी. ढोलकी फडाच्या तमाशातील लावणी नृत्यप्रधान होती. गायनप्रधान आणि नृत्यप्रधान लावण्यांनी ढोलकी फडाच्या तमाशात जान आणली. गायनप्रधान आणि अदाकारीची लावणी उत्तर पेशवाईत माड्यांवर रंगली. सुंदराबाई, गोदावरी पुणेकर, सत्यभामाबाई पंढरपूरकर, यमुनाबाई वाईकर, बकुळा इस्लामपूरकर, कौशल्या कोपरगावकर, हिराबाई अवसरीकर, लैला-चांगुणा आदी कलावंतीणींनी रागदारी थाटाच्या अदाकारीच्या लावणीचा सुवर्णकाळ निर्माण केला. या लावणीचे वैभव काय वर्णावे! अगदी



अनुक्रमणिका

अलीकडच्या काळात संगीत नाटक अकादमी पुरस्कार विजेत्या यमुनाबाई वाईकर आणि सत्यभामाबाई पंढरपूरकर यांच्या लावण्या ऐकल्या असतील, त्यांनाच गायनप्रधान व अदाकारीच्या लावणीचे सामर्थ्य उमगेल. 'तुम्ही माझे सावकार' ही यमुनाबाई वाईकर यांनी सादर केलेली विलंबित रागदारी थाटाची लावणी ऐकली की उत्तर पेशवाईतील लावणीचे वैभव स्मरते. 'उंची माडीवरती चला, भाग द्या मला' या हिराबाई अवसरीकरांच्या लावणीने अंधाराच्या लावणीला उजाळा मिळतो, तर 'घाबरले गं बाई' ही सत्यभामाबाईंनी सादर केलेली लावणी बालिकावधूच्या मधुचंद्राची भावार्तता दाखवून जाते.

नृत्य, नाट्य, अभिनय आणि संगीत ही लावणीची प्रमुख अंगे आहेत. खरं तर लावणीचा खरा उद्देश म्हणजे मनोरंजन आणि प्रबोधन होय. भेदिक शाहिरी परंपरेतून, विविध रचना प्रकारातून स्पर्धात्मक स्वरूपात लावणीचे खरे सादरीकरण झालेले दिसते. तमाशात ज्या वाद्यावरती लावणीचा साज आणि बाज चढला ती ढोलकी, पेटी, टाळ, तुणतुण्याच्या आणि घुंगराच्या साथीने लावणीचा शृंगारिक भाव रंगमंचावर व्यक्त होतो. लोकनाट्यातील सादरीकरणामुळे लावणीला पुन्हा एकदा नव्याने लोकप्रियता मिळाली. त्यानंतर ती मुक्त झाली; आणि लोकनाट्याच्या बोर्डावरून थेट निर्जीव चित्रपटाच्या पडद्यावर ढोलकीच्या तालावर आणि घुंगरावर ठेका धरू लागली. बघता-बघता तिने जनसामान्यांत लोकप्रियता मिळविली.

**लावणीचे स्वरूप :**

लावणी म्हणजे सर्वसामान्य जनांच्या मनोरंजनाकरिता त्यांना रुचतील अशा लौकिक पौराणिक व आध्यात्मिक विषयावर रचलेली कडे वा ढोलके यांच्या तालावर विशिष्ट ढंगाने म्हटलेले खटकेबाज सफाईदार पद्यावर्तनी व भृंगावर्तनी जातिरचना म्हणजे लावणी. त्यामुळे लावणी मध्ये शृंगारिक, भौतिक व आध्यात्मिक आशय दिसून येतो. लावणी सादरीकरणाचे तीन प्रकार पडतात–१) शाहिरी लावणी - ही लावणी डफ, तुणतुण्याच्या साहाय्याने म्हटली जाते. २) बैठकीची लावणी - ही लावणी रागदारीत बसवलेली असते. ती ठुमरीच्या ढंगाने गायली जाते. या लावणीला तबला-पेटीची साथ आवश्यक असते. नायकीणी व कलावंतीणी अशा प्रकारच्या लावण्या म्हणतात. ३) तमाशातील लावणी - ही लावणी तमाशाच्या फडात म्हटली जाते. नाची, सोंगाड्या, नाच्या आणि इतर कलावंतांच्या नृत्याभिनयातून ही लावणी साकार होते.

**सांगली जिल्ह्याच्या लावणी रचनाकारांची परंपरा :**

तमाशा आणि लावणी या लोककलेमुळे तर सांगली जिल्हा महाराष्ट्रात नावारूपाला आला. महाराष्ट्रातील तमाशाला, चित्रपटाला, लोकनाट्याला आणि आकाशवाणीवरून प्रसारित होणाऱ्या लावणींने आपला साजशृंगार सांगली जिल्ह्यातील तमासगिरांच्या फडातून व्यक्त केला. या फडातून जी लावणी सादर केली जाते. तिला फडाची लावणी असे म्हणतात. आजही हे फड गावोगावी फिरून जत्रेत, यात्रेत आणि उत्सवातून लोकांचे मनोरंजन आणि प्रबोधन करीत आहेत. सांगली जिल्ह्यातील विद्यमान तमाशा फडातून लावणीरचना करणारे अनेक सिद्धहस्त लावणीरचनाकार आहेत. त्यात भेदिक लावणी रचनाकार शंभुराजू भिलवडीकर, सातू सुबराव आणि सातू हिरू कवलापूरकर, शाहीर मार्तंडा कुलकर्णी (काराजंगी, ता. जत), शाहीर बावाखान दरवेशी-शेख (करगणी, ता. आटपाडी), शाहीर रमजान बागणीकर (बागणी, ता. वाळवा), शाहीर गणपतराव लवटे (देशिंग, ता. कवठे महांकाळ) हे झाले भेदिक शाहिरी परंपरेचे वारसदार. त्यानंतर तमाशा आणि चित्रपटाला दिलेल्या लावणीरचनेमधील शाहीर पठ्ठे बापूराव (रेठरे हरणाक्ष), ग.दि.माडगुळकर (आटपाडी), पी. सावळाराम (येडे

निपाणी), अशोकज़ी परांजपे (हरीपूर), शोकशाहीर आण्णाभाऊ साठे (वाटेगाव), भा.ल.रानडे (सांगली), प्राचार्य पी.बी. पाटील (सांगली), श्रीकांत नरुले (असद), चिंतामणी पोतदार (सांगली). शाहिरी लावणी शाहीर राजा पाटील (कवठे महांकाळ), शाहीर बापूराव विभुते (बुधगाव), शंकरराव मेंढे (मिरज), दत्तू अर्जुन वाडे (मिरज), ज्योती बाळ शिंदे (मिरज), ईश्वर कृष्णा धुळूबुळू (मिरज). तमाशा फडातील लावणीरचना लिहिणारे गणपतीराव व्ही. माने (चिंचणीकर), अतंबर सौंदडे (शिरढोण), रमेश वाघमारे (खलाटी), सामाजिक प्रबोधनपर लावणीरचना लिहिणारे पांडुरंग प्रभु माळी (तडसर), सु.धो.मोहिते (मोहिते वडगाव), सुनंदा शेळके (जत), सुधाकर इनामदार (गोमेवाडी), हणमंतराव शिंदे (शिंदेवाडी घोरपडी), अर्जुन रामचंद्र संकपाळ (सावळीवाडी), पी. सागावकर (तासगाव), आकाशवाणी सांगली केंद्रावरून लावणीचे प्रकाशन करणारे गुलाब मुल्ला (रामानंदनगर) या सांगली जिल्ह्यातील लावणीरचनाकारांच्या रचनेवर ज्या लावणी नृत्यांगनांनी रंगमंचावर ठेका धरला. त्या नृत्यांगना यमुनाबाई बनपुरीकर, लता पवार, शोभा लाखे, बानू शेख, सारिका वाघमारे, शालन खिलारे, यरुशा मोहिते, लंका बस्तवडेकर, छाया मोहिते, के. मधुबाला आणि हसीना कवठेकर यांच्या लावणीसादरीकरणाला संगीताचा साज आणि बाज दिला ते दिग्गज संगीतकार हे सांगली जिल्ह्याच्या मातीतलेच. ते म्हणजे संगीतकार वसंत पवार, राम कदम हे मिरजेचे तर संगीतकार बाळ पळसुले हे सांगलीचे. यांच्या संगीतसाजाने मराठी लावणी सजली आणि बहरली.

**लावणीला सांगली जिल्ह्याचे योगदान :**

सांगली जिल्ह्याच्या रचनाकारांमुळे, संगीतकारांमुळे व नृत्यांगनांमुळेच लावणी कलारूप होऊ लागली. सांगली जिल्ह्यातील लावणीचे खरे समर्थक शाहीर पट्ठे बापूराव यांनीच महाराष्ट्राच्या पारंपरिक लावणीवर साज-शृंगार चढविला. यांच्या काव्यांनी व लावण्यांनी, ब्राह्मण कुळात जन्माला येऊनही, कर्मकांडाला दूर करून बापूरावांनी फडावर थाप मारली; आणि खड्या आवाजात लावणी म्हटली. ती अशी,

*''ही नटरंगी नार मारी काळजाला वार*
*पाडी कासोट्याला पार, चापुनीया पट्टी ।*
*पाटलाला दावला चाळा ।*
*कुलकर्ण्याला घातला डोळा ।*
*मास्तरांनी सोडली शाळा; हिच्यासाठी ॥''*

याच कालखंडात भिलवडीच्या संभूराजू भिलवडीकर हे तुरेवाले शिवाला, तर हैबतीबाबा कलगीवाले हे शक्तीला श्रेष्ठ मानणारे भेदिक शाहीर सांगली जिल्ह्यातच उदयास आले. याच भेदिक लावणीतून भक्ती, ज्ञानसाधना, गुरुभक्ती इत्यादी विषयांवर रचना लिहीत असत. त्याच कवलपुरचे सातू-सुबराव हे कलगीवाले त्यांची सातूची लावणी पुढीलप्रमाणे,

*''नांदाय जाते खुशालीत रहावा*
*देते वळक या माझ्या गावा*
*तुम्ही येऊन तरी बघा*
*नाही दियाची मी दगा''*

स्वातंत्र्योत्तर कालखंडात शाहीर ग.दि.माडगुळकरांची 'तुझ्या उसाला लागल कोल्हा' आणि 'केला इशारा जाता-जाता' या चित्रपटातील लोकप्रिय लावण्यात रुपकात्मक आहेत.

शाहीर अण्णाभाऊ साठे यांची संयुक्त महाराष्ट्र चळवळीवर आधारीत लावणी निर्माण केली.

*''माझी मैना गावावर राहिली*
*माझ्या जिवाची होतीय काहिली''*

स्थलकालपरत्वे लावणी जन्मास आली. ती लावणी लिहिली सांगलीच्या भा.ल.रानडे यांनी .ती अशी,

*''ऐका थाप डफावरची*
*लावणी खाशी सांगलीची ॥*



अनुक्रमणिका

*सांगली बहुत चांगली ।*
*गल्ली ते दिल्ली भल्यांचे बोल*
*हा जिल्हा जिद्दीचा किल्ला, पराक्रम पल्ला,*
*रत्ने अनमोल*
*गावफुले, राजे पटवर्धन, वेचूनीया धन,*
*धन, करिता वर्धन*
*वसंतदादा वाढवी वैभव, विक्रमी थोर मराठीशान''*

भा.ल.रानडे यांनी सांगलीच्या वैभवशाली परंपरेचे वर्णन आपल्या, वरील लावणीत जसेच्या तसे चित्रित केले आहे.

*''कृष्णाकाठी वांगी चवदार, तूप कणीदार,*
*हळद गाभेदार*
*ज्वारीचे जन हे तूळ, तरुण ते पुष्ठ पाठीचे पोहणार*
*सांगली न्याय पंढरी पैलवानपुरी, किर्तनाची थोरवी*
*किती वर्णावी''*

शांतिनिकेतनचे प्राचार्य डॉ. पी.बी.पाटील यांनीही कोल्हापूरच्या वैभवशाली कलापरंपरेचे आणि तिथल्या भौगोलिक पार्श्वभूमीचे वर्णन केले. ते अशा स्वरूपात,

*''चल जाऊ कोल्हापुरी । पंचगांगा नदीतीरी*
*कोल्हापुरी राजधानी मावळ्यांची*
*कोल्हापुरी फेटा बांधा । कोल्हापुरी पायतान*
*पैलवान छाती काढून चाल पुढती''*

अशी ही कोल्हापूरची लावणी शांतिनिकेतन कवठे महांकाळच्या शाहीर राजा पाटील यांची लावणी फडाची!

*''रत्नकराबाई तुम्ही दिलवरा*
*प्राण सागरा राग जरा आवरा*
*तुम्हासाठी करीन मी प्राणाचा कुस्करा*
*काल राती सपान मशी पडलं*
*सपनात नको ते राया घडलं*
*जागी झाली एकलीच*
*चेहरा झाला बावरा''*

शृंगारिक लावणीच्या बरोबर बैठकीची लावणीही जन्मास आली आणि थेट चित्रपटाच्या रंगमहालात पेश झाली. ती अशी,

*''रंग महाली शेज गुलावी*
*भक्ती फुलांच्या माळा*
*एकांती करू शराबी*
*सजना कसा न आला*
*नवसाची ही तुमच्यासाठी*
*सजली चांदणीरात*
*नाही आला सख्या सजना''*

अशा स्वरूपाच्या बैठकीच्या लावणीला साजशृंगार चढवला तो सांगलीचे चिंतामणी पोतदार यांनी. याच प्रसंगी सुनंदा शेळके यांनी शृंगारिक लावणीला लावणीचं लावण्य दिलं.

*''रातकिड्यांची जमली मैफल*
*चमचमतो काजवा*
*रंग महाली मध्यानरातीला*
*जळतो काळज दिवा''*

याच प्रसंगावर नजर ठेवून लावणीत शृंगाराचा साज चढवला तो सांगली जिल्ह्यातील असदचे श्रीकांत नरुले यांनी. त्यांची रचना पुढीलप्रमाणे,

*"टचून भरलंय कणीस औंदा,*
*हातात मावत न्हाई*
*करा लवकर मळणीची घाई"*

तारुण्याने मुसमुसलेल्या जवानीतील स्त्रीचे वर्णन मोहक आणि चित्तवेधक आहे.

सांगली जिल्ह्यातील पंचवीस लावणीरचनाकारांनी आपल्या लावणीरचनेत भेदिक लावणीपासून ते बोर्डावरच्या खेळापर्यंत आणि ढोलकीफडाच्या तमाशापासून ते चित्रपटाच्या पडद्यावर ढोलकीच्या ठेक्यावर आणि घुंगराच्या बोलावर लावणीचा ठेका धरला. याच लावणीला शृंगाराचा अस्सल बाज आणि साज दिला तो मिरजेचे संगीतकार राम कदम, वसंत पवार आणि सांगलीचेचे बाळ पळसुले यांनी. त्यामुळे सांगलीची लावणी ढोलकीफडाच्या तमाशातून ते थेट चित्रपटाच्या पडद्यावर ठेका धरू लागली. सातासमुद्रापार गेली. याला सांगली जिल्ह्यातील प्रतिभावंत लावणीरचनाकारांचे, शाहिरांचे, संगीतकारांचे आणि नृत्यांगनांचे मोठे योगदान ह्या लोककलेला लाभले.

**सांगली जिल्ह्यातील लावणी रचनाकारांची यादी :**

१) शाहीर पठ्ठे बापूराव - रेठरे हारणाक्षर
२) ग.दि.माडगुळकर - माडगुळ, ता. आटपाडी
३) पी. सावळाराम - येडे निपाणी
४) आण्णाभाऊ साठे - वाटेगाव
५) अशोकजी परांजपे - हरीपूर
६) भा.ल.रानडे - सांगली
७) श्रीकांत नरुले - असद
८) चिंतामणी पोतदार - सांगली
९) सु.धो. मोहिते - मोहिते-वडगाव
१०) पांडुरंग प्रभु माळी - तडसर
११) सुधाकर इनामदार - गोमेवाडी
१२) हणमंतराव शिंदे - शिंदेवाडी घोरपडी
१३) सुनंदा शेळके - जत
१४) शंभूराजू भिलवडीकर - भिलवडी
१५) सातू-हिरु कवलापूरकर - कवलापूर
१६) सातू-सुबराव कवलापूरकर - कवलापूर
१७) शाहीर बापूराव विथुते - बुधगाव
१८) शाहीर राजा पाटील - कवठे महाकाळ
१९) शाहीर बावाखान दरवेशी - करगणी
२०) शाहीर मार्तंडा कुलकर्णी - काराजंगी
२१) शाहीर रमजान बागणीकर - बागण
२२) शाहीर गणपतराव लवटे - देशिंग
२३) गणपतराव व्ही. माने - चिंचणी, तासगाव
२४) अतंबर बापू सौंदडे - शिरढोण
२५) गुलाब मुल्ला - रामनंदनगर
२६) अर्जुन रामचंद्र संकपाळ - सावळीवाडी
२७) पी. सागावकर - तासगाव
२८) शंकर मेंढे - मिरज
२९) दत्तू अर्जुन वाडे - मिरज
३०) ज्योती बाळ शिंदे - मिरज
३१) ईश्वर कृष्णा धुळुबुळू - मिरज

**सांगली जिल्ह्याचे संगीतकार**

१) वसंत पवार - मिरज
२) राम कदम - मिरज
३) बाळ पळसुले - सांगली.



**प्रा. आबासाहेब शामराव शिंदे**
मु.पो. ता. कवठे महाकाळ, (विद्यानगर),
जिल्हा सांगली ४१६४०५,
फोन : ९४२११८३४३५.



अनुक्रमणिका

सोलापूरच्या वाङ्मयीन संस्कृतीची वेधक ओळख :

## प्रदेश सृजनाचा – डॉ. सुहास पुजारी

– प्रा. विश्वास वसेकर

*[एखाद्या शहराचा इतिहास म्हणजे त्या भूप्रदेशातील कर्तबगार माणसे! साहित्य-समाज-संस्कृतीला आकार देणारी माणसेच असतात. तीच त्या भूप्रदेशाची ओळख असते. इतरांनी कितीही 'होर्डिंग्ज' उभारले तरी हे सांस्कृतिक सामाजिक वैभव पुसले जात नाही. सोलापूर म्हटले की शाहीर रामजोशी, 'भेटेन नऊ महिन्यांनी...' म्हणून फाशीकडे जाणाऱ्या क्रांतिकारकाने आईला दिलेले आश्वासन काव्यबद्ध करणारे कवी कुंजविहारी, 'लमाणांच्या तांड्यातील कारुण्य टिपणारे' कवी वि.म. कुलकर्णी, शाहीर अमरशेख, शाहीर विश्वासराव काटे, ज्ञानपीठ पुरस्कार विजेते कन्नडकवी द.रा. बेन्द्रे, कवी दत्ता हलसगीकर, पक्षीमित्र व वन्यजीवनाचे अभ्यासू साहित्यिक मारुती चितमपल्ली, निर्मलकुमार फडकुले, डॉ. द.ता. भोसले, लक्ष्मीनारायण बोल्ली अशा २७ प्रज्ञावंतांची ओळख म्हणजे सोलापूर जिल्ह्याचे चरित्रच!*

*–संपादक]*

---

'प्रदेश सृजना'चा हा ग्रंथ लिहून होण्याला एक सुंदर निमित्त घडले. महाराष्ट्रातील महत्त्वाच्या साहित्यिकांच्या साहित्यसेवेचा परिचय करून देण्याची 'ऐसी अक्षरे रसिके' ही मालिका आकाशवाणीने वर्षभर प्रसारित केली. प्रतिदिनी पाच मिनिटांचा हा कार्यक्रम सगळ्या मराठी केंद्रांवरून प्रसारित होत असे. डॉ. सुहास पुजारींची एकतीस भाषणे सगळ्या महाराष्ट्राने त्यावेळी ऐकली. या भाषणांचा सुधारून वाढवलेला आणि काही नव्याने समाविष्ट केलेल्या एकोणचाळीस लेखांचा संग्रह म्हणजे 'प्रदेश सृजनाचा' हा ग्रंथ होय.

सोलापुरात मराठीसह, संस्कृत, कन्नड, तेलुगू, उर्दू, हिदी, इंग्लीश अशी बहुभाषिक संस्कृती आढळते. त्यामुळे साहित्य, समीक्षा याबरोबरच अनुवाद व भाषिक संस्कृतीही 'प्रदेश सृजना' चा मधून प्रकट झाली आहे. सोलापूरच्या साहित्यधारेचा मागोवा घेताना प्रस्तुत ग्रंथात काही कन्नड व हिंदी साहित्यिकांचाही त्यामुळेच समावेश झालेला आढळतो. विविध साहित्य प्रकारांत व प्रवाहांत लक्षणीय योगदान देणाऱ्या साहित्यसेवकांच्या वाङ्मयीन कामगिरीचा लेखाजोखा या ग्रंथात एकत्रित असा प्रथमच घेतला गेला आहे. हा ग्रंथ म्हणजे सोलापूर जिल्ह्याच्या वाङ्मय इतिहासाचा बहुमूल्य असा दस्तऐवज आहे. एक सांस्कृतिक गरज त्यातून पूर्ण झाली आहे असे म्हणता येईल. सोलापूरच्या समृद्ध साहित्यधारेची ओळख त्यातून पुढल्या पिढ्यांना होईल, हे निश्चित!



'प्रदेश सृजनाचा' या ग्रंथाच्या मनोगतात डॉ. पुजारी यांनी आपली या ग्रंथनिर्मितीमागची भूमिका मांडली आहे. ती महत्त्वाची आहे. ते लिहितात, "पुष्कळदा आपले अवधान दूरवर असते. अवघ्या महाराष्ट्राला आणि त्याबाहेर पसरलेल्या मराठी साहित्यसंस्कृतीला आणि त्याच्या उपासकांना आपण आठवत असतो,

न्याहाळत असतो. दूरचे दिवे आपणाला आकृष्ट करीत असतात. परंतु आपल्या माथ्यावर विलसत असणारे 'नक्षत्रांचे झुंबर' मात्र आपल्या दृष्टिआड राहाते. त्याकडेही आपले अवधान खेचण्याचा एक प्रयत्न आपण का करू नये? 'प्रदेश सृजनाचा' मागची तीच भूमिका आहे. या ग्रंथात समाविष्ट असलेले लेखककवी हे सोलापूरचे आहेत. त्यांची लेखनभूमी सोलापूरची आहे, ही गोष्ट खरी आहे, तरीही सोलापूरच्या या लेखककवींची दखल अवघ्या महाराष्ट्र सारस्वताने आणि संस्कृतीने घेतली आहे. सोलापूरचे हे लेखक केवळ सोलापूरचे नाहीत, तर अवघ्या महाराष्ट्राचे आहेत. त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा वेध संग्रहरूपात प्रथमच या ग्रंथात घेतला गेला आहे. संदर्भ मूल्याच्या दृष्टीने त्याला निश्चितच महत्त्व आहे.''

श्री सिद्धरामेश्वर हे सोलापूरचे ग्रामदैवत. या ग्रंथात त्यांनाच अग्रपूजेचा मान मिळाला आहे. सिद्धरामेश्वर जसे थोर शिवयोगी होते, तसे ते कवीही होते. सुमारे तेराशे वचने त्यांची उपलब्ध आहेत. या पहिल्या लेखाचे स्वरूप संशोधन, माहिती आणि व्यक्तिचित्र असे सरमिसळून गेलेले आहे. श्रीशुभराय महाराज आणि शाहीर रामजोशी हे सोलापूरचे नाव महाराष्ट्राच्या नकाशावर नेणारे आणखी दोन प्राचीन कवी. त्यांच्यावरील लेख रसाळ आणि हृद्य झाले आहेत.

वालचंद नानचंद शहांपासून आधुनिक सारस्वतांच्या परिचयांना प्रारंभ होतो. महाकवी द. रा. बेंद्रे, कुंजविहारी, संजीव, मा.गो. काटकर, शाहीर अमरशेख, वि.म.कुलकर्णी, त्र्यं.वि.सरदेशमुख, रा.ना. पवार, सुमेरचंद जैन, डॉ. निर्मलकुमार फडफुले, डॉ.भगवानदास तिवारी हे येथील लेखांचे नायक साऱ्या महाराष्ट्राला परिचित आहेत. सोलापूरच्या या प्रतिभावंतांनी आणि विद्वानांनी मराठी साहित्य संस्कृतीसाठी मोलाचे योगदान केले आहे. त्याचा सुंदरसा तपशील या लेखांतून मिळेल.

समकालीन लेखकांच्या विभागाचा प्रारंभ माझे(ही) गुरुवर्य डॉ. गो.मा. पवार यांच्यावरील लेखाने होतो. विठ्ठल रामजी शिंदे यांच्या संबंधीचे मौलिक लेखन आणि विनोदाची सोपपत्तिक समीक्षा यामुळे गुरुवर्य उत्तुंग स्थानावर जाऊन पोहोचले आहेत. कवी दत्ता हलसगीकर, डॉ. द.ता. भोसले, प्रा. निशिकांत ठकार, डॉ. अजीज नदाफ, सुरेखा शहा, डॉ. लक्ष्मीनारायण बोल्लींपासून हेमकिरण पत्कीपर्यंत त्यांच्या विविध परंतु कसदार लेखनाने त्या-त्या वाङ्मयप्रकाराची समृद्धता वाढलीच आहे. साहित्य संगीतादी कलेचे रसिक प्रा. श्रीराम पुजारी, पत्रकार व प्रभावी वक्ते विवेक घळसासी, कन्नड लेखक वसंत दिवाणजी यांच्यासंबंधीचे या संग्रहातील लेख निश्चितच वेधक व्यक्तिदर्शनाने अतिशय वाचनीय झाले आहेत. सोलापूरचा वाङ्मयीन प्रदेश कसा सृजनाचा आहे, याचा नेटका परिचय तर या पुस्तकातून होतोच, पण त्याबरोबरच लेखकालेखकांतील परस्पर भावबंधांच्या, आठवणींच्या, तत्कालीन संदर्भांच्या विविध पैलूंना या पुस्तकात उजाळा मिळतो. त्यातून एक समृद्ध वाङ्मयीन संस्कृती उलगडण्यासही साहाय्य होते. संदर्भमूल्याच्या दृष्टीनेही हे लेखन महत्त्वाचे आहे.

डॉ. पुजारी यांनी या सारस्वतासंबंधी लिहिताना जन्म, मातापिता, शिक्षण, उपजीविकेचे साधन, प्रकाशित ग्रंथसंपदा, वाङ्मयीन कर्तृत्व, लेखनविशेष, मूल्यमापन आणि अखेर अशी एक निश्चित रूपरेषा आखून, विविध पैलूंचा वेध घेत ही साहित्यिकांची व्यक्तिचित्रे उभी केली आहेत. काही लेखकांच्या हृद्य आठवणीही यात आहेत. सर्वच लेखकांची

छायाचित्रेही आहेत.

'प्रदेश सृजनाचा' मधील डॉ. पुजारी यांची भाषा ललितरम्य आहे. रसिकतेने व अभ्यासवृत्तीने त्यांनी सर्व ग्रंथकारांचा शोध घेतला आहे. डॉ. सुहास पुजारी हे मुळातच साहित्याचे समीक्षक आहेत. साहित्याकडे नेमकेपणाने, मर्मज्ञ वृत्तीने पाहाणे हा त्यांचा मूळ स्वभाव आहे. शिवाय या ग्रंथात समाविष्ट एकोणचाळीस लेखकांपैकी समकालीन असणाऱ्या लेखकांचा निकटचा सहवास त्यांना लाभला आहे. त्यामुळे प्रस्तुत लेखनास विश्वासार्हता लाभली आहे. सोलापूरच्या सारस्वतांविषयीचा ग्रंथ सिद्ध करताना त्याला केवळ प्रांतिक संकुचितपणा येणार नाही याची काळजीही डॉ. पुजारी यांनी घेतली आहे. कोणत्याही साहित्य रसिकाला भावेल, उपयुक्त ठरेल, असे हे लेखन आहे.

'प्रदेश सृजनाचा' मधील लेखांची शीर्षके देखील या पुस्तकाच्या एकूणच गुणात्मकतेत भर घालणारी आहेत. समर्पक, साजेशी आणि सूचक अशी ही शीर्षके या लेखनाच्या सौंदर्याला दुणावणारी आहेत. 'शाहिरी कवितेतील कोहिनूर : रामजोशी' 'मराठी कवितेतील अत्तराचा फाया : कवी संजीव', 'माणसांचा सागर उसळविणारा महाराष्ट्रशाहीर : अमरशेख', 'दयाघन देवाच्या बागेतले फूल : कवी वि.म.कुलकर्णी', 'दु:खाची गाथा उलगडणारा प्रतिभावंत', 'देवाशी बोलणारा कवी : रा. ना. पवार', 'संतचरित्रामृतात विरघळलेला जीव : दा. का. थावरे' ही त्याची काही उदाहरणे. अशा गुणांनी 'प्रदेश सृजनाचा' हा ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण झाला आहे.

"देशविदेशातील ग्रंथालयात तेथील शहरातील साहित्यिकांच्या साहित्य संपदेचे आणि त्यावरील संदर्भ साहित्याचे स्वतंत्र दालन पाहायला मिळते. साहित्य संस्कृतीच्या अभिवृद्धीसाठी ते आवश्यक असते, ही दृष्टी त्यामागे असलेली आढळते. आपल्याकडे मात्र असे प्रयत्न झाल्याचे फारसे पाहायला मिळत नाहीत. ते होण्याची आवश्यकता आहे." लेखकाने मनोगतात मांडलेला हा विचारही महत्त्वाचा आहे.

सुविद्या प्रकाशनाचे संचालक श्री. बाबुराव मैंदर्गीकर व श्री. शिरीष घाटे यांच्या कलादृष्टीने साकारलेले मुखपृष्ठ आणि अंतरंगाची मांडणी यामुळे ही निर्मिती आकर्षक रूपात वाचकांसमोर आली आहे.



**प्रदेश सृजनाचा**
*लेखक :* डॉ. सुहास पुजारी,
सुविद्या प्रकाशन, सोलापूर, २०१३
*पृष्ठे :* १६२, *मूल्य :* १४०.

**प्रा. विश्वास वसेकर**
लक्ष्मणरेषा, फ्लॅट नं. २४,
डी. बिल्डींग, मंत्री हाईट्स,
४९५/४९६, शनिवार पेठ,
पुणे ४११०३०.
चलभाष : ९९२२५२२६६८.

ह्या अंकाचे मुद्रणकार्य चालू असतानाच गीतकार कवी **सुधीर मोघे** यांचे दु:खद निधन झाल्याची बातमी कळली. पुढील अंकात सविस्तर लेख येईल. तूर्त त्यांच्या दिवंगत आत्म्यास श्रद्धांजली वाहणे एवढेच हाती आहे.

पुस्तक परिचय

# 'दिवसाच्या वाटेवरून' — एक उःशाप!

**—डॉ. संगीता बर्वे** — यशोधरा साठे

*[ 'दिवसाच्या वाटेवरून' अनुभवांना सामोरे जाणे एवढाच ह्या कवितेचा विषय नाही. अनुभवांशी एकरूप होण्यापलिकडची 'सायुज्यता, म्हणजे स्त्रीजीवनाची कविता आहे. आई, पत्नी, मुलगी या भूमिकांमधून दिवस जगणारी वाटच जीवन होऊन जाते. मुळातच हे संवेदनाशील जगणे अलवार आहे. त्या संवेदनशीलतेने 'स्त्री'ने स्वतःला जीवनाशी बांधून घेतलेले नाही; तर संवेदनाशीलतेला सहज मिळालेल्या कवितारूप उःशापात जगणे – स्वाभाविक जगणे, ती निवडते! त्याला रुढार्थाने कविता म्हणतात. अंगाई, अडगुली-मडगुली, जात्यावरची ओवी, हादगा – भुलाबाईची गाणी, डोहाळेगीत, विहीण – ही कवितासखी हाच एक उःशाप! डॉ. बर्वे यांनी यथार्थपणे कवितेला म्हटले आहे – 'अक्षरलेण्यांमधील शापित परी!' स्त्रीजीवनावरील कविता म्हणजे 'स्त्री-वादाचीच वाट' ह्या समीकरणाच्या मळलेल्या वाटेवरून ही कविता जात नाही हे जाणवते! यशोधरा साठे ह्यांनी ते नेमके शोधले आहे. –संपादक]*

---

'दिवसाच्या वाटेवरून' हा संग्रह वाचताना जाणवते की 'ती' जगताना जे वेगवेगळे अनुभव घेते आहे त्यांना भिडण्याची व ते शब्दांतून व्यक्त करण्याची तिची ताकद मोठी आहे. म्हणून त्या कविता वाचल्यानंतर किती एक काळ मनात रेंगाळत राहतात. ते अनुभव आपल्याही मनाचा ठाव घेतात. या कवितांतले काही उत्कट नाजूक क्षण हळुवारपणे वेचावेसे वाटतात.

या संग्रहात काय नाही? निसर्गकविता आहेत, प्रेमकविता आहेत, 'कविते'बद्दलच्या कविता आहेत. नातेसंबंधांच्या कविता आहेत. 'शहरा'बद्दलच्या कविता आहेत. कवयित्रीच्या दवाखान्यात येणाऱ्या रुग्णांबद्दलच्या कविता आहेत. इतरही विविध अनुभवांना, क्षणांना तिने कवितेत आपलेसे केलेले आहे.

कविता ही तिची सखी आहे. जणू तिचा श्वासच! म्हणून ती शब्दांना उद्देशून म्हणते :

"अक्षरांचे माझे हात अखेर तुमचाच आधार शोधत राहतील."

अति संवेदनशीलतेचा शाप भोगता भोगता कविता हा स्वतःला मिळालेला उःशाप आहे; असे तिला वाटते.

तिच्या निसर्गकवितांत निसर्गप्रतिमा जगण्याचे रूप घेऊन येतात. ती म्हणते :

*"चैतन्याने सळसळताना*
*दंव भिजलेल्या उन्हापरी मी*
*वेळू मधुनी येते अलगद*
*वाऱ्यावरती सुरांपरी मी"*

आणि एका ठिकाणी ती म्हणते :

*"ह्या डुलणाऱ्या गवतावरती*
*स्वतःस मी ही झोकून देते*
*सळसळणाऱ्या वाऱ्यावरची*
*हिरवी, हिरवी लाटच होते"*

निसर्ग नुसता पार्श्वभूमी म्हणून तिच्या कवितेत येत नाही, तो तिच्या जगण्याशी एकरूप होऊन येतो.

प्रेमाचे एक रूप - मीलन! रात्र प्रीतीचे रंग ठेवून जाते - कशी :

*"काळोखाला विळखा घालत रात्र चंदनी आली*
*देहामधली तगमगणारी लाट सुगंधी झाली"*

नातेसंबंधांच्या कवितांत उत्कटपणे जपलेले काही क्षण आहेत. वडिलांबद्दल, आईबद्दल तिच्या मुलींबद्दल त्या कविता आहेत. आजारी वडिलांच्या डोळ्यांतली अनोखी चमक तिला सांगून जाते तिचीच लहानपणीची प्रतिमा त्यांच्या डोळ्यांत असते. वयात आलेल्या मुलीचा एक उत्कट अनुभव, छोट्या मुलीची मृत्यूबद्दलची विचारणा, आई म्हणते तसा "आपल्या दोघींत काहीच फरक नाही बाई" यामागचे उत्कट सत्य हे सारेच भिडणारे आहे.

तिच्या कविता वाचताना जाणवते की, थोडक्या शब्दांत ती बरेच काही सांगून जाते. ही कविता मिताक्षरी! शब्दांचा फाफटपसारा नाही. तसेच कवितेचा शेवटही योग्य टप्प्यावर!

तिच्या महत्त्वाच्या कविता आहेत. स्त्रीचं दुःख, तिची अगतिकता, तिची उपेक्षा! 'स्त्रीत्वा' बद्दलच्या कविता. त्याबराबेरच पुरुषांना मिळणारं स्वातंत्र्य, त्यांचं वर्चस्व, त्यांना मिळणारा मोकळेपणा, ह्याबद्दलचे विचारही तिच्या कवितात येतात. बाईला काहीच मतस्वातंत्र्य कसं नाही, तिचं 'रुटीन' रोजच्या त्याच त्याच गोष्टी व त्यामुळे येणारा कंटाळा ह्यांचं वर्णन कवितांत आहे. ती लिहिते,

*"तिच्या जाणिवेपर्यंत पोचत नाही*
*कुठलाच वैश्विक विचार*
*ती विचार करते*
*मूल शाळेतून आल्यावर*
*खायला काय करावं*
*जेवणाला रात्रीच्या*
*कोबी चिरावी की फरसबी"*

किंवा

*"कणीक तिंबते,*
*फोडणी घालते*
*चटणी करते*
*नव्हे,*
*तिला अस्वस्थ करणाऱ्या विचारांचे*
*ती चूर्ण करते"*

आणि शेवटी

*'स्वप्नांच्या बिया पेरत चालत राहाते*
*तेव्हा तिच्या ओंजळीत काय उरते?'*

असं हे स्त्रीचं प्राक्तन.

रूढार्थानं ही कविता स्त्रीमुक्तीची कविता नाही अन् तरी त्याचा एक पदर तिला आहे. स्त्रीच्या जगण्याचा!

ती वेध घेते आहे जगण्याचा आणि शोध घेते आहे स्वतःचा. हे नाकासमोर चालणे असह्य होत चालले आहे, असे तिला वाटते,

*"इतका धारदार असतो का आयुष्याचा विळा?*
*अवघा जन्म सहाणेवर घासला -*
*तरी भाळी लागणारच नाही का सुखाचा टिळा?"*

हा प्रश्न तिला जगताना पडतो. आपण आहोत, जिवंत आहोत याचा निर्भेळ आनंदही घेता येत नाही, नुसते जिवंत असणे म्हणजे काही जगणे नाही, हे तिला मनोमन पटलेले आहे. आई, बायको 'करिअरिस्ट वुमन' ही बिरुदं चिकटलेली असतांना आपण नेमके काय आहोत हा प्रश्न तिला पडतो.

*"पुढचं काही सांगत*
*काठ भिजू लागलेत पापण्यांचे*
*थांबते"*

एवढंच ती म्हणू शकते. या चार भिंतींत सुरक्षित राहाण्याचा तिला कंटाळा आलाय.

*"अस्वस्थसे जिणे सारे*
*भिजते पापणी*
*एका शब्दासाठी झाले*
*आयुष्य कहाणी"*

असं ती म्हणते. "मी मातीची तर ही दुसरी अक्षरलेण्यांमधली शापित परी" अशी स्वत:चीच दोन रूपे ती पाहाते. पण अखेर या जगण्याचा मी सप्रेम स्वीकार केला आहे असं ती म्हणते. व्यवस्थेशी भांडण्याची धमक माझ्यात नाही असे नाही, पण वाऱ्याची लकेर प्रसन्न वाहील अशी धून मला निर्माण करायचीय, नव्या पिढीला सुंदर स्वप्न पाहायला शिकवायचंय असं ती म्हणते आणि म्हणून

*"मी निमूट मातीकडे पाहिले*
*अन् एका कोवळ्या किरणाचे बोट धरून*
*दिवसाच्या वाटेवरून*
*कृतज्ञतेने चालत राहिले"*

असं ती म्हणते. ती कृतज्ञता मला महत्त्वाची वाटते. हा स्वीकार मला महत्त्वाचा वाटतो.

हा स्वीकार आहे आणि आयुष्यात सारंसारं अनुभवल्या-भोगल्यानंतर होणारा तो अनोखा स्पर्श तिला होतोय - परतत्त्व स्पर्श. चालून चालून पाय थकले आहेत, थांबायचा ध्यास लागला आहे. आयुष्याचा साज उतरला आहे. अशावेळी ती हळुवारपणे 'मला हृदयाशी धर' असं कृष्णाला विनवते आहे. आत्म्याच्या पोकळीत फक्त देवदिवा लावावा असं तिला वाटत आहे. अर्थाचा अनर्थ करू नका. त्यातला परमार्थ पाहा असं ती म्हणते. सगळ्यांतून तावून सुलाखून निघाल्यानंतर लाभणारी शांतता आता तिला लाभते आहे ती म्हणते,

*"शांततेचे ब्रह्मकमळ*
*फुलून येतेय*
*आतून अगदी आतून"*

(ही निखळ शांतता फार थोड्या जणांना लाभत असावी.) अखेरीचा ह्या कवितांचा हा स्पर्श मनाला मोहून टाकतो. जाणवतं की कवयित्रीला तरल संवेदनशीलतेचंच नाही तर बुद्धिमत्तेचंही वरदान लाभलेलं आहे. म्हणून हा अध्यात्म-विचार बोजड न होता सहजपणे ह्या कवितांत प्रकटला आहे. कवितांचे विषय वेगवेगळे असले, तरी कवयित्रीला संवेदनाशील मनाची देणगी असल्यामुळे प्रत्येक अनुभवाला ती तितक्याच उत्कटतेने सामोरी जाताना दिसते.

कवितेच्या आकृतिबंधाबद्दल बोलायचे, तर कवितांतला तोल कुठेही जराही ढळलेला नाहीये. तिच्यातील अंतर्गत लय आशयाला अनुसरूनच प्रकट झालीये. आशय व अभिव्यक्ती ह्यांची एकरूपता तिथे आहे. ही एकरूपता क्वचितच पाहावयास मिळते.

संगीताच्याच एका कवितेतल्या चार ओळींत तिच्या कवितेचे व जगण्याचे सार आले आहे असे वाटते त्या अशा–

*"थोडे धुके थोडे ऊन*
*थोडी बासरीची धून*
*मनातल्या मनातच*
*घेते थोडेसे नाचून"*



कवितासंग्रह
**'दिवसाच्या वाटेवरून', – डॉ. संगीता बर्वे**
*प्रकाशन :* पॉप्युलर प्रकाशन मुंबई.
*पृष्ठसंख्या :* ८८, *किंमत :* रु. ९५/-

**यशोधरा साठे**
१, रजनीगंधा सोसायटी, १८५ यशवंत नगर,
तळेगाव दाभाडे, ता. मावळ,
जि. पुणे : ४१०५०७.



अनुक्रमणिका

**एका मर्मज्ञ वाङ्मयाध्यापकाचे चिंतनसंचित साहित्य :**

# आस्वाद, अध्यापन आणि समीक्षा — डॉ. सतीश बडवे

– डॉ. आशुतोष पाटील

*[अध्यापनकेंद्रित समीक्षादृष्टी विकसित करताना, अध्यापनाची आणि साहित्यसमीक्षेची सूत्रे यांचा समन्वय साधणारी अध्यापनकला डॉ. वा.पु. गिंडे यांनी जपली. ही अध्यापनकला साहित्यरसिकांचेही मन वेधून घेईल. मध्ययुगीन आणि आधुनिक साहित्याचा परामर्श ह्या अंगांनी घेतला आहे. ह्या अनवट समीक्षादृष्टीचा परिचय करून देण्यासाठी डॉ. वा.पु. गिंडे यांच्या निवडक लेखांचे संपादन आणि परीक्षण डॉ. सतीश बडवे यांनी ग्रंथरूपात आणले आहे. डॉ. आशुतोष पाटील ह्यांनी त्याचा परिचय करून देताना अध्यापनलक्षी, वाङ्मयलक्षी आणि रसिकलक्षी अशा त्रिमिती समीक्षादृष्टीचा परिचय करून दिला आहे. तो शिक्षणशास्त्रात नवे दालन उघडविणारा आहे. –संपादक]*

डॉ. वा. पु. गिंडे हे मध्ययुगीन संतसाहित्याचे विशेष अभ्यासक म्हणून सर्वपरिचित आहेत. वारकरी संप्रदायाची वाङ्मयनिर्मिती आणि ज्ञानेश्वरांचे काव्य यांच्या अभ्यास-संशोधनात त्यांनी मौलिक भर घातली आहे. याशिवाय मराठी वाङ्मयाच्या अध्यापनक्षेत्रात नव्याने पदार्पण करणाऱ्या कोणत्याही तरुण अध्यापकाची वाङ्मयविषयक अध्यापनाची दृष्टी प्रगल्भ आणि सखोल करणारा 'वाङ्मयाचे अध्यापन' हा लक्षणीय संदर्भग्रंथ संपादित करण्याची महत्त्वपूर्ण कामगिरीदेखील डॉ. गिंडे यांनी (डॉ. द.दि.पुंडे यांच्या सहकार्याने) पार पाडली आहे. अनेक विद्यार्थ्यांच्या वाङ्मयीन जाणिवा आपल्या अध्यापनातून समृद्ध करणारे डॉ. गिंडे सेवानिवृत्तीनंतर आता बेळगाव येथे स्थायिक झाले आहेत. नोकरीतील बदल्या आणि सततची धावपळ यातून मार्ग काढीत प्रसंगोपात त्यांनी विपुल समीक्षात्मक लेखन केले. निरनिराळ्या निमित्तांनी त्यांचे लेखन झाले असले तरी त्यातून डॉ. गिंडे यांची सुसंगत, मर्मज्ञ, एकसंघ अशी वाङ्मयविषयक दृष्टी प्रवाहित झाल्याचे जाणवते. डॉ. गिंडे यांच्या अशा लेखनापैकी काही निवडक लेखांचे सूत्रबद्ध संपादन करून एका वाङ्मयचिंतकाच्या मर्मदृष्टीला रसिक वाचक व अभ्यासक यांच्यापर्यंत पोहोचविण्याची महत्त्वाची कामगिरी डॉ. सतीश बडवे यांनी पार पाडली आहे.

डॉ. वा. पु. गिंडे यांच्या लेखांचे संकलन व संपादन असलेल्या **'साहित्य : आस्वाद, अध्यापन आणि समीक्षा'** या पुस्तकाची मांडणी तीन भागांमध्ये केलेली आहे. अशा तीन टप्प्यांत विभागलेल्या डॉ. गिंडे यांच्या लेखांवरून एक नजर फिरवली असता ध्यानात येते की, आकलन, आस्वाद, अर्थनिर्णयन, विश्लेषण आणि मूल्यमापन अशा सर्व स्तरांवरून वाङ्मयकृतीचे मर्म जाणून घेणे, ही अस्सल वाङ्मयाध्यापक-अभ्यासक-समीक्षक-संशोधकाची जबाबदारी डॉ. गिंडे यांनी सर्वार्थाने महत्त्वाची मानली आहे. वाङ्मयीन परामर्शावर अभ्यासदृष्टी रेंगाळू न देता तिला विशिष्ट वाङ्मयीन कृतीच्या अंतरंगाचा, अर्थपूर्णतेचा ठाव घेण्यासाठी कार्यरत ठेवणे, ही भूमिका त्यांनी स्वीकारल्याचे प्रकर्षाने जाणवते.

वारकरी परंपरेने डॉ. गिंडे यांच्या जीवनधारणेचे भरणपोषण केलेले असल्याने संतकाव्याचा आस्वाद आणि त्याचे अध्यापन या बाबींना त्यांच्या चिंतनप्रक्रियेत अधिक अवसर लाभलेला आहे. कलाकृतीच्या आस्वादप्रक्रियेसंबंधी विवेचन करताना ज्ञानेश्वरीच्या अनेकांगी आस्वादाबाबत त्यांनी मांडणी केली आहे. 'घनु वाजे घुणघुणा...' या विरहिणीतून शब्दांची, रूपांची, नादांची, गंधांची, स्पर्शाची, स्वरांची, रंगांची विलक्षण किमया ज्ञानेश्वरांनी कशाप्रकारे साधली आहे,

याबाबत एका स्वतंत्र लेखातून डॉ. गिंडे यांनी विवेचन केले आहे. तुकारामांची अभंगवाणी काळाला भेदून जाणारी, म्हणूनच आजही समकालीन वाटणारी कशी आहे याबाबत मांडणी करताना ते तुकारामांच्या भक्तिपर अभंगांचे मर्म उलगडत जातात. संत मुक्ताईच्या अभंगकाव्याची अर्थपूर्णता एका स्वतंत्र लेखातून विशद केली आहे. त्यांच्या आस्वाददृष्टीला मुक्ताईच्या कवितेतून जाणवणारा तिच्या व्यक्तिमत्त्वातील प्रौढपणा ठळकपणे अधोरेखित करावासा वाटतो. सिद्धावस्थाच तिच्या अभंगांतून कशी प्रकट झाली आहे, सगुणभक्तीपेक्षा साक्षात्काराचे अनुभव त्यांतून कसे आले आहेत, याकडे ते आपले लक्ष वेधतात. अशा अभंगांहून सर्वस्वी निराळे 'ताटीचे अभंग', त्यातील रसपूर्णता आणि लौकिक भावभावना यांची पृथगात्मता विस्ताराने नोंदवतात. संतकाव्यावरील अशा आस्वादपर लेखनात वैशिष्ट्यपूर्ण असा लेख म्हणून 'संत चोखामेळा : एक आकलन' या लेखाचा विचार करावा लागतो. त्या लेखातून चोखामेळ्याच्या अंत:करणातील अंत्यज म्हणून वाट्यास आलेले दु:ख, वेदना यांचे प्रकटीकरण त्याच्या अभंगांतून कशातऱ्हेने आले आहे ते विशद केले आहेच. त्यासोबतच संतांना टाळकुटे आणि प्रतिगामी ठरविणाऱ्या मतांचाही समाचार डॉ. गिंडे यांनी नेटकेपणाने घेतला आहे. 'आजच्या समाज संकल्पना त्या काळाला लावून त्यांच्या साहित्याचा अभ्यास करणे हे समाजशास्त्रीय समीक्षेत सुद्धा बसणार नाही.' (पृ.५६) असा स्पष्ट शब्दांत निर्वाळा ते देतात. डॉ. गिंडे यांच्या वाङ्मयास्वादक वृत्तीसोबतच वाङ्मयचिकित्सक भूमिकेचा प्रत्यय देणारा लेख म्हणून 'संतांच्या अभंगवाणीचा आस्वाद' या लेखाचे महत्त्व ध्यानात घ्यायला हवे. अभंग या मध्ययुगीन रचनाप्रकाराची अनेकांगी चर्चा व चिकित्सा करणारी मांडणी या लेखातून येते. अशी मांडणी दुर्मीळ आहे. अभंगाची प्राचीनता, ओवीचे अभंगरचनेशी असणारे नाते, निखळ आत्माविष्कार आणि उद्बोधन अशा अभंगरचनेमागील ठळक प्रेरणा, अभंगाला छंदप्रकार-रचनाप्रकार म्हणून लाभलेले रूप, भावकविता म्हणून अभंगाचा विचार, त्याचबरोबर भारुडे, पांगळा, आंधळा, पाईक आदी अभंगांमधून जाणवणारी नाट्यात्मकता व कथनात्मकता अशा विविध मुद्द्यांचा ऊहापोह करीत अभंग-रचनाप्रकाराचा गाभा डॉ. गिंडे नेमकेपणाने मांडत गेले आहेत.

संतकाव्याच्या आस्वाद-अर्थनिर्णयनात रमलेली गिंडे यांची समीक्षादृष्टी ह्या काव्याच्या अध्यापनाबाबत देखील सूक्ष्म चिंतन करताना आढळते. याचा प्रत्यय 'मध्ययुगीन मराठी कवितेचे अध्यापन' आणि 'मध्ययुगीन साहित्य : अध्ययन आणि अध्यापन' या दोन लेखांतून येतो. पहिल्या लेखातून मध्ययुगीन कवितेच्या अध्ययन-अध्यापनाबाबतच्या उदासीन वातावरणाबद्दल प्रारंभी चिंता व्यक्त केली आहे आणि पुढील भागात धर्मसंप्रदायांचा अभ्यास – पंथीय तत्त्वज्ञानाची जाण; वाङ्मयनिर्मिती हे संतकाव्याचे साधन आहे, साध्य नव्हे याचे भान; विशिष्ट काळ, तत्कालीन सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक परिस्थिती यांचे सम्यक आकलन; तत्त्वज्ञान व वाङ्मयीन सौंदर्य यांचा मिलाफ; एकच आशय, एकच कथावस्तू भिन्न भिन्न कालखंडांतील कवींनी कशाप्रकारे हाताळली याचा शोध; लेखननिष्ठ व श्रोतृनिष्ठ अभिरुचीच्या संदर्भात विचार; काव्यप्रकार व रूपबंध याबाबत चर्चा - अशा निरनिराळ्या पातळ्यांवरून मध्ययुगीन कवितेच्या अध्ययन-अध्यापन गवसणारी सूत्रे सोदाहरण विशद केली आहेत. या मांडणीला जोडूनच दुसऱ्या लेखातील विवेचन लक्षात घेता येते. मध्ययुगीन साहित्याचे अध्ययन-अध्यापन यांच्या अर्थपूर्ण दिशांचे सूचन करताना ह्या लेखात डॉ. गिंडे लिहितात, 'बहिर्गामी पद्धतीमुळे चरित्रात्मक, मानसशास्त्रीय, समाजशास्त्रीय, संकल्पनात्मक, तात्त्विक (मार्क्सवादीचाही समावेश करावा) आणि अंतर्गामी पद्धतीमुळे कलात्मक मूल्य वृत्त छंद (मीटर), तंत्राची चर्चा (टेक्निक), संहिता, वैज्ञानिक (स्टायलिस्टिक ॲप्रोच) प्रतिमा, प्रतीके, आदिबंधात्मक, चिन्हशास्त्र अशा अनेक अंगांचा विचार करता येईल. तुलनात्मक अंगानेही विचार होऊ शकेल. केवळ 'कथन पद्धती' (नॅरेटिव्ह स्टाईल) च्या दृष्टीने संत आणि पंत यांच्या

कलाकृतींचा विचार करता येईल...' (पृ. १३९) यातून मध्ययुगीन साहित्याच्या अध्ययन-अध्यापनात नवसमीक्षा दृष्टिकोनांचे उपयोजन करण्याची डॉ. गिंडे यांची अभिनव मीमांसादृष्टी ध्यानात येते.



केवळ मध्ययुगीन नव्हे तर आधुनिक साहित्यातील निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांचे अध्यापन हा डॉ. गिंडे यांच्या सातत्याने चालणाऱ्या मनन-चिंतनप्रक्रियेचा एक महत्त्वाचा भाग आहे. या दृष्टीने सदर पुस्तकातील एकूण सहा लेख लक्षवेधक ठरतात. त्यांपैकी एका लेखातून साहित्याच्या अध्यापनाची सूत्रे काही साहित्यकृतींची आणि साहित्याभ्यासकांच्या मतांची चर्चा करून विशद केली आहेत. त्यात विशेषत: कवितेच्या (मध्ययुगीन ते आधुनिक) अध्यापनावर लक्ष केंद्रित केले आहे. त्या अंगाने विचार करण्यासाठी मांडलेली अध्यापनाची सूत्रे मुळातून वाचण्यासारखी आहेत (पृ. ११०). डॉ. गिंडे यांनी महाविद्यालयीन स्तरावर वाङ्मयाचे अध्यापन दीर्घकाळ केल्याने त्या स्तरावरील अध्यापन हा त्यांच्या अभ्यासाचा विषय होणे स्वाभाविकच आहे. परंतु आपल्याच कर्तव्याकडे आपण स्वत:च वस्तुनिष्ठपणे बघणे, ही विवेकी अभ्यासदृष्टी आज दुर्मीळ होत असताना डॉ. गिंडे यांचे अशा तऱ्हेचे चिंतन लक्षणीय ठरते. त्याचाच परिपाक म्हणून सदर पुस्तकातील 'विद्यापीठीय अध्यापन : समीक्षा मूल्ये' हा लेख विचारात घ्यावा लागतो. त्यातून वरिष्ठ पातळीवरील वाङ्मयाच्या अध्यापनाची व्यापक दिशा स्पष्ट करताना डॉ. गिंडे लिहितात, 'विद्यापीठीय अध्यापनात समीक्षा व्यवहारात त्या प्राध्यापकाने वाचन, चिंतन, मनन आणि अध्यात्मशास्त्रातील शब्द योजायचे तर निदिध्यास, तत्त्वपदार्थशोधन, व्यासंग, संवेदनशीलता यांची नितांत गरज आहे.' (पृ.१२७). ज्ञानेश्वरी, आधुनिक कविता आणि कादंबरी यांच्या समीक्षेविषयी मूलभूत स्वरूपाचीच मांडणी करून ह्या स्तरावरील अध्यापनात त्यांचे उपयोजन कसे करता येईल यासंबंधी विस्तारपूर्वक विवेचन या लेखातून आले आहे. याच अनुषंगाने वाङ्मयप्रकारनिष्ठ अध्यापनाची चर्चा करणारे सदर पुस्तकातील तीन लेख आपले लक्ष वेधून घेतात. त्यांपैकी कथा या वाङ्मयप्रकाराच्या अध्यापनाविषयी मांडणी करताना डॉ. गिंडे सुरुवातीला अन्य वाङ्मयप्रकारांहून असलेले कथेचे भिन्नत्व अधोरेखित करतात आणि त्यानंतर लेखाच्या पुढील भागात कथा या वाङ्मयप्रकाराचे स्वरूप, त्याची वैशिष्ट्ये नोंदवून, त्याच्या प्रकारांची दखल घेऊन काही कथांच्या साधार विश्लेषणासह कथेच्या अध्यापनाची दिशा सूचित केली आहे. कादंबरी अध्यापनाबाबतच्या लेखात वाङ्मयेतिहास आणि वाङ्मयप्रकार यांचे आकलन, व्यवस्थापन आणि समीक्षा यांसंबंधी केलेली सूत्ररूप मांडणी मौलिक स्वरूपाची आहे. प्रत्यक्ष वाङ्मयीन कलाकृती, विविध कालखंड व सांस्कृतिक पार्श्वभूमी अशा तीन अंगांनी वाङ्मयेतिहासाचा शोध आणि ललित-ललितेतर वाङ्मयप्रकारांच्या वर्गीकरणाची भूमिका यांबाबत नेटके विवेचन करून डॉ. गिंडे कादंबरीच्या अध्यापनाकडे वळतात. आशय व अभिव्यक्ती अशा दोन्ही अंगांनी कादंबरीचे विश्लेषण अध्यापनातून कशा प्रकारे करता येऊ शकते; तसेच एक वाङ्मयप्रकार म्हणून कादंबरीकडे बघण्याची विद्यार्थ्यांची आकलनदृष्टी कशी संस्कारित करता येते, यासंबंधी या लेखातून मार्मिक मांडणी आली आहे. कथा-कादंबरीहून भिन्न अशा नाटक या वाङ्मयप्रकाराच्या अध्यापनाबाबतही डॉ. गिंडे एका स्वतंत्र लेखातून विवेचन करतात. वाङ्मयप्रकारांचे स्वरूप स्पष्ट करून त्यांची वैशिष्ट्ये नोंदविणे आणि त्यांच्या अध्यापनाबाबत मार्गदर्शन करणे, निव्वळ एवढ्यापुरतेच डॉ. गिंडे यांचे हे लेखन मर्यादित नाही. वाङ्मयप्रकारांत होणारी सरमिसळ, देवाणघेवाण व प्रकारांतर यांचीही चर्चा स्वतंत्रपणे करून विद्यार्थ्यांसोबतच रसिक वाचकांचीही वाङ्मयप्रकारांची संकल्पना अधिक सुस्पष्ट होण्याचा मार्ग अशा

लेखनातून प्रशस्त होत जातो. वाङ्मय-प्रकारांतराची प्रक्रिया, तिची कारणमीमांसा, तिचे स्वरूप याबाबत 'चक्र' या एकांकितेचा 'माता द्रौपदी' या नाटकापर्यंत झालेला प्रवास विस्तारपूर्वक उलगडून दाखवून या बऱ्याचशा अलक्षित अंगाचा सूक्ष्म अभ्यास त्यांनी एका लेखातून आपल्यासमोर मांडला आहे.

साहित्याच्या आशयाचा, त्याच्या रूपबंधाचा विचार करणारी डॉ. गिंडे यांची विचक्षण दृष्टी विद्यार्थ्यांच्या वाङ्मयविषयक आणि जीवनविषयक जाणिवा समृद्ध करण्यासाठी सतत प्रयत्नशील आहे. त्यातूनच वाङ्मयाचे बहुअंगी आकलन करून घेणे या अभ्यासदृष्टीला महत्त्वाचे वाटते. याचा प्रत्यय 'प्रेम आणि मरण : आविष्काराची दोन रूपे' आणि 'पसायदान : ज्ञानेश्वर आणि मर्ढेकरांचे' या दोन लेखांतून येतो. कर्तव्याच्या पूर्तीसाठी त्याग करायला तयार होणे हे मानवी जीवनातील उदात्त मूल्य ही कल्पना 'एकच प्याला' तील सिंधू आणि वाग्वैजयंतीतील 'प्रेम आणि मरण' यांमधून आली आहे, हे अधोरेखित करून एकाच लेखकाच्या दोन कलाकृतींतून व्यक्त होणाऱ्या कल्पनेतील साधर्म्य-वैधर्म्य शोधण्याची तुलनात्मक साहित्याभ्यासाची भूमिका या लेखाच्या केंद्रस्थानी आहे. याच तऱ्हेने दोन भिन्न लेखकांच्या लेखनातून प्रत्ययास येणारी अंत:प्रेरणेच्या पातळीवरील समतानता ज्ञानेश्वर आणि मर्ढेकर यांच्या पसायदानांच्या तुलनात्मक अध्ययनातून लक्षात आणून दिली आहे. याचाच पुढचा टप्पा म्हणून 'गेल्या पाव शतकातील मराठी समीक्षा : काही निरीक्षणे' हा या पुस्तकातील अखेरचा लेख आपल्यासमोर येतो. आस्वाद, आकलन, अर्थनिर्णयन, अध्ययन-अध्यापन, चिकित्सा, मूल्यमापन या निरनिराळ्या टप्प्यांवरून प्रवाहित झालेली डॉ. गिंडे यांची वाङ्मयविषयक दृष्टी अंतिमत: वाङ्मयीन समीक्षेच्या गंभीर व जबाबदार व्यवहारापर्यंत येऊन ठेपते. मराठी वाङ्मयीन समीक्षाव्यवहाराचा विस्तारित पट उलगडून दाखवताना समीक्षक, ग्रंथ, लेख, नियतकालिके यांचा ते परामर्श घेतात. मराठी समीक्षेच्या जमेच्या बाजू ते मांडतात. पण त्याचबरोबर बोजडपणा, शब्दबंबाळता, ढोबळपणा यांमध्ये ती हरवून जाऊ नये आणि समकालीन साहित्याच्या प्रेरणा, संवेदनविश्व, सामाजिक, सांस्कृतिक विश्व जाणून घेऊन समीक्षेची मांडणी करायला हवी अशा विकसनाच्या दिशाही सूचित केल्या आहेत.

डॉ. वा. पु. गिंडे यांचा हा लेखसंग्रह म्हणजे एका विद्यार्थीकेंद्री, वाङ्मयसंवेदी अध्यापकाचा एका अर्थाने जीवनप्रवासच आहे. विद्यार्थ्यांपर्यंत साहित्यकृतीला सर्वार्थाने पोहोचविण्यासाठी अध्यापक हा प्रथमत: वैयक्तिक पातळीवर त्या साहित्यकृतीच्या आस्वादापासून ते आकलन आणि अर्थनिर्णयना-पर्यंतच्या वाटेवरून मार्गक्रमण करीत असतो. त्यामुळे डॉ. गिंडे यांचे सदर पुस्तकातील लेख हे त्यांच्या अध्ययनप्रवासाचे आणि त्यातून पुढे अविरत सुरू असलेल्या अध्यापनसाधनेचे प्रत्यंतर देणारे आहेत. त्यामुळे वाङ्मयीन अध्यापनाच्या क्षेत्रात नव्याने पाऊल टाकणाऱ्याच्याच केवळ नव्हे तर या क्षेत्रात स्थिरावलेल्या अनुभवी अध्यापकाच्याही वाङ्मयीन आकलनदृष्टीला नवे कंगोरे प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य सदर पुस्तकातील लेखांमध्ये निश्चितच आहे. मराठी वाङ्मयाची प्राचीनतम ते आधुनिक अशी व्यापक परंपरा कवेत घेणारे आणि त्याबाबतच्या मौलिक चिंतनाला सूत्रबद्धतेने मांडणारे डॉ. वा.पु.गिंडे यांचे हे लक्षणीय वाङ्मयसंचित वाङ्मयाचे विद्यार्थी-अध्यापक यांच्यापर्यंत पोहोचविल्याबद्दल सदर पुस्तकाचे संपादक आणि प्रकाशक निश्चितच धन्यवादास पात्र आहेत.

*('साहित्य : आस्वाद, अध्यापन आणि समीक्षा'- (डॉ. वा. पु. गिंडे यांच्या निवडक लेखांचा संग्रह) संपादन - डॉ. सतीश बडवे, चिन्मय प्रकाशन, औरंगाबाद, २०१३).*



**डॉ. आशुतोष पाटील**
साहाय्यक प्राध्यापक, मराठी विभाग,
भाषा अभ्यास प्रशाळा व संशोधन केंद्र,
उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.



अनुक्रमणिका

## निवडक कवितांची सर्वंकष चिकित्सा

# कवितेची आस्वादरूपे : डॉ. पंडितराव पवार

– डॉ. पी. विठ्ठल

*[केशवसुत, मर्ढेकर– प्रभावानंतर सत्तरोत्तरी कवितेचा परामर्श या ग्रंथात प्रा. पंडितराव पवार ह्यांनी घेतला आहे. अभिजनकेन्द्री, बहुजनकेन्द्री समूहकेन्द्री, श्रमजीवनकेन्द्री, कृषिजीवनकेन्द्री इ. आशय-आविष्काराच्या वाटेने विकसित झालेली ही कवितेची आस्वादरूपे! –संपादक]*

आधुनिक मराठी कविता आता सुमारे सव्वाशे वर्षांची झाली आहे. या दीर्घकाळात कवितेची भाषा, शैली, रचना आणि एकूणच गुणवैशिष्ट्यांमध्ये मूलभूत स्वरूपाचे बदल होत गेल्याचे दिसते. कधी ती भावनिक हिंदोळ्यावर झुलली, तर कधी संज्ञात्मक. म्हणजे केशवसुतांपासून तर अलीकडच्या ऐश्वर्य पाटेकरपर्यंतच्या दीर्घ परंपरेत अनेक कवींनी लक्षणीय असे योगदान आहे. प्रत्येकानेच कवितेच्या प्रवाहाला वाहते ठेवले आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळात केशवसुत, तर स्वातंत्र्योत्तर काळात मर्ढेकर युवप्रवर्तक कवी म्हणून नावाजले. या दोन टप्प्यांतील या दोन्ही महत्त्वाच्या कवींच्या प्रभावाखाली तर कधी समांतर अशा रचना मराठीत होत राहिल्या. साठच्या दशकानंतर तर कवितेचे विविध प्रवाहच रूढ झाले. नियतकालिकांतल्या कवितेनेही आपली स्वतंत्र मुद्रा उमटवली. सामाजिक बांधीलकीची आणि नव्या दृष्टीकोनाचा स्वीकार करून पारंपरिक मूल्यव्यवस्थेची चौकट तोडणारी कविताही याच काळात लिहिली गेली. कवितेचा विस्तार झाला. अभिजनकेंद्री कविता बहुजनकेंद्री झाली. आशयसूत्रेही बदलत गेली. सत्तरच्या दशकात कविता खऱ्या अर्थाने भाषिक आणि संरचनात्मक पातळीवर बदलली. नव्वद नंतर पाय रोवलेल्या जागतिकीकरणाने ग्रामीण आणि महानगरी अशा दोन्ही पातळ्यांवर अस्वस्थता पेटली. या अवस्थेतून पुन्हा कवितेचा पारंपरिक रचनाबंध झुगारून काहीशी मुक्त स्वरूपाची कविता अभिव्यक्त होऊ लागली. सामाजिक स्तरावर उमटणारे सर्वच पडसाद कवितेतही उमटू लागले. समूहकेंद्री होत असतानाच ती अधिक आत्मनिष्ठ आणि व्यक्तिकेंद्री होत गेली. प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष कवींचे दृष्टिकोनच बदलत गेल्यामुळे कवितेतून व्यक्त होणाऱ्या क्रिया-प्रतिक्रियांचे स्वरूप आणि जाणिवाही बदलल्या.

हे सर्व विवेचन करण्याचे कारण म्हणजे डॉ. पंडितराव पवार यांचा 'कवितेची आस्वादरूपे' हा नवा ग्रंथ होय. कवितेकडे अत्यंत आस्थेने बघणारे आणि कविता हाच अभ्यासविषय निवडून अत्यंत गांभीर्याने कवितेची मर्मग्राही चिकित्सा करणारे अभ्यासक म्हणून डॉ. पवार दिसून येतात. विशेषत: कवी अनिलांच्या कवितांचा त्यांनी केलेला अभ्यास एकूण मराठी समीक्षेत मोलाचा ठरला आहे. कवीला आत्मभान देण्याचे कार्य डॉ. पवार यांची समीक्षा करत आली आहे. विश्लेषक समीक्षेचा नवा आविष्कार म्हणून त्यांच्या 'कवितेची आस्वादरूपे' या नव्या ग्रंथाकडे बघता येते. शीर्षकात 'आस्वाद' असा शब्द असल्यामुळे या ग्रंथाचे स्वरूप लक्षात येऊ शकते. आवडलेल्या कवितांच्या आंतररहस्याचा शोध घेण्याचा त्यांनी यशस्वी प्रयत्न केला आहे. कवीची केवळ प्रशंसाच ते करत नाहीत किंवा अगदीच



अनुक्रमणिका

दोषांचा अधिक्षेपही ते करत नाहीत. अत्यंत समतोलदृष्टी ठेवून केलेली त्यांची समीक्षा वाचकांना कवितेकडे घेऊन जाण्यासाठी साहाय्यभूत ठरणारी आहे. एवढेच नव्हे, तर त्या-त्या कवीला त्याच्या सर्जनकार्यात मदत करणारीही आहे. या ग्रंथामुळे कवींनाही आपल्या निर्मिती प्रक्रियेकडे अधिक डोळसपणे बघता येईल. अनेकदा पारिभाषिक दुर्बोधतेमुळे समीक्षालेखांच्या वाटेला वाचक जात नाहीत. कारण त्यामुळे वाचकांचा गोंधळ उडण्याची शक्यता असते. मात्र प्रस्तुत ग्रंथात शोधकवृत्तीने आणि विशेष पूर्वग्रह न बाळगता केलेली समीक्षा असल्यामुळे ती कवितेच्या आस्थेवाईक हितचिंतकांना जशी उपयुक्त ठरणारी आहे तशीच ती लेखकाचा म्हणजे प्राचार्य पंडितराव पवार यांचा कवितेविषयीचा निर्मळ व्यासंग दर्शविणारीही आहे.

'महाकवीची प्रतिभा लाभलेल्या कुसुमाग्रजांना' हा ग्रंथ अर्पण केला आहे. प्रारंभी लिहिलेल्या भूमिकेतून त्यांनी एकूण मराठी कवितेच्या गुणवैशिष्ट्यांचा ऊहापोह केला आहे. एकूण चौदा दीर्घ लेख असणाऱ्या या ग्रंथात एकाही कवयित्रीवर मात्र लेखकाने लिहिलेले नाही. कवी गोविंद, स्वा. सावरकर आणि कुसुमाग्रजांच्या राष्ट्रीय अनुबंध शोधणाऱ्या पहिल्या लेखात राष्ट्रीय जाणिवेची पूर्वपीठिकाच कथन केल्यामुळे अभ्यासकांची मोठी सोय झाली आहे. तीनही कवींच्या कवितांची उदाहरणे देऊन लेखकाने आपली निरीक्षणे नोंदवली आहेत. या लेखातून कवींच्या जाणिवांची प्रकृति लक्षात येऊ शकते. कोणत्याही राष्ट्राच्या अस्तित्वात आणि समाजाच्या विकासात सांस्कृतिक, आर्थिक आणि राष्ट्रीय जाणिवांना अव्वल स्थान असते, हे लक्षात घेतले तर या लेखाचे मोल नक्कीच कळू शकेल. कवी अनिल यांच्या कवितेची चिकित्सा करणारे तीन लेख प्रस्तुत ग्रंथात समाविष्ट आहेत. बहुआयामी कवी म्हणून त्यांनी अनिलांचा यथार्थ गौरव केला आहे. 'प्रयोगशीलता ही अनिलांच्या प्रतिभेचे वेगळेपण दर्शविणारी घटना आहे. म्हणून त्यांना एक बीजकवी म्हणून संबोधावयास हरकत नसावी.' असे भाष्य लेखकाने केले आहे. मुक्तछंदाचे प्रवर्तक म्हणून त्यांचा उल्लेख करताना त्यांच्या एकूणच योगदानाची नोंद डॉ. पवार घेतात. अनिलांच्या जानपद रचना आणि कवितेतील स्त्री चित्रणाची त्यांनी स्वतंत्र लेखात मांडणी केली आहे. नारायण सुर्वे हे स्वातंत्र्योत्तर काळातील एक अग्रग्रणी कवी. मानवतावादाचा पुरस्कार करणारे आणि प्रस्थापित व्यवस्थेच्या विरोधात संयत विद्रोह करणारे कवी म्हणून सुर्व्यांची ओळख आहे. 'कष्टकऱ्यांचे चालतेबोलते विद्यापीठ' असे अत्यंत समर्पक शीर्षक असलेल्या लेखात लेखकाने सुर्व्यांचा 'श्रमजीवी माणसाला मराठी कवितेत अग्रस्थान देणारे कवी' म्हणून उल्लेख करतानाच संत कवी, केशवसुत आणि मर्ढेकरांची तुलना करत सुर्व्यांचे मोठेपण सिद्ध केले आहे. ग्रामीण कवितेला नवी ओळख देणारे आणि वैदर्भीय बोलीचा अविष्कार करणारे वऱ्हाडी कवी विठ्ठल वाघ यांना ऐकणारे खूप असतात, पण त्यांच्या कवितेविषयी फारसे लिहिले गेले नाही. प्राचार्य पवारांनी जाणीवपूर्वक 'कपाशीची चंद्रफुले' या कवितासंग्रहाचे परीक्षण केले आहे. वास्तवता आणि सौंदर्यानुभव यांचा सुंदर मिलाफ या संग्रहात झाल्याचे सांगत प्रस्तुत कवितेच्या अनुषंगाने वाघांच्या कवितेची वैशिष्ट्येच नमूद केली आहेत.

नव्वदोत्तर मराठी कवितेत इंद्रजित भालेराव यांचे स्थान खूप वरचे आहे. विशेषतः ग्रामीण कवितांचा विचार करताना भालेरावांच्या कवितांचा

विचार अपरिहार्य ठरतो. लेखकाने भालेरावांच्या कवितेचे केलेले अवलोकन अभ्यासकांना उपयुक्त ठरणारे आहे. कृषिजीवनावरील अपार निष्ठा आणि माणसांशी असलेले दृढ नाते यांचा अपूर्व संयोग भालेरावांच्या कवितेत होत असल्याचे लेखक सांगतात, 'पीकपाणी', 'दूर राहिला गाव', 'वेचलेली कविता', 'भूमीचे मार्दव' या चार संग्रहांचा आणि दोन दीर्घ कवितांचा पुरेशा गांभीर्याने अभ्यास करून चार लेखात सुसंगत मांडणी केली आहे. 'माझ्या वर्तमानाची नोंद' या पी. विठ्ठल यांच्या कवितासंग्रहाचे एक दीर्घ परीक्षणही या ग्रंथात आहे. पी विठ्ठल यांच्या कवितेविषयी पुढील निरीक्षण नोंदविले आहे. 'कवीने आजच्या वास्तवाचे चित्रण बहुधा अभिधाशक्तीच्या आधारे केले आहे. समाजाची वास्तवता, त्यातील वृत्ति - प्रवृत्तींचे स्वरूप कधी उपरोधाने, तर कधी तिरकस शैलीत केले आहे. कवीची आशावादी वृत्ती आजच्या अंधारमय वर्तमानाला कितीतरी नवी दृष्टी देणारी आहे.

प्रत्येक कवितेच्या अंतरंगात शिरून तिचा शोध घेणारी दृष्टी प्रस्तुत लेखकाकडे असल्यामुळे प्रत्येक संग्रहाची यथासांग चर्चा ते करतात. 'मराठी कवितेतील शेतकरी जीवनाचे प्रतिबिंब' या लेखात बहिणाबाई चौधरी यांच्यापासून तर श्रीकांत देशमुख, महेश मोरे यांच्यापर्यंत अनेक कवींच्या कवितांचा अभ्यास केला आहे. 'भुईशास्त्र: कृषिसंस्कृतीच्या वेदनेचा आविष्कार' हा या ग्रंथातील शेवटचा लेख आहे. ऐश्वर्य पाटेकरची कविता कृषिसंस्कृतीशी आणि ग्रामजीवानशी घट्ट नाते बांधणारी आहे. आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ पातळीवर ती व्यक्त होते. असा विचार ते मांडतात.

एखादी कविता समजून घेताना त्या कवितेमागील सामाजिक, सांस्कृतिक कालव्यवहाराचाही विचार प्राचार्य डॉ. पवार करतात. कवीची प्रकृति, प्रेरणा, आशय आणि आविष्कारपद्धती याकडेही ते वाचकांचे लक्ष वेधतात. समीक्षेच्या साचेबंद आणि तांत्रिक बाबींना झुगारून आस्वाद, आकलन आणि मूल्यमापन अशा त्रि-स्तरावर या ग्रंथाची मांडणी आहे. त्यामुळे मराठी कवितेच्या अभ्यासकांना निश्चितच या ग्रंथाचा उपयोग होईल असे वाटते.

**''कवितेची आस्वादरूपे'' (समीक्षा)**
प्राचार्य, डॉ. पंडितराव पवार,
ज्योती प्रकाशन, नाशिक.
*पृष्ठे :* २६०, *किंमत :* रु. ३५०/-

**डॉ. पी. विठ्ठल, नांदेड**
मो. ९८५०२४१३३२
साहाय्यक प्राध्यापक, मराठी विभाग,
स्वा. रा. ती. मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.





अनुक्रमणिका

# समाजभूषण कै. रा. ना. चव्हाण

– डॉ. अशोक कामत, पुणे

स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर काळात बहुजन समाज जागरणाचे कार्य अत्यंत निष्ठापूर्वक करणारा 'रा. ना.'च्या सारखा अन्य ज्ञानोपासक दाखविणे अवघड आहे. त्यांनी राजकारणात अग्रेसर असणाऱ्या बहुजन नेत्यांशी जवळीक साधून कधीच वैयक्तिक कामासाठी काही केले नाही. त्यांचे विविध सामाजिक विषयांवरील लेखन ते सतत नियतकालिकांतून प्रसिद्ध करीत. पण व्यक्तिगत प्रसिद्धीची त्यांना कधीच अपेक्षा नसे. समाजहितैषी वृत्तीने काही लेखन आणि अबोलपणे समाजासाठी निरंतर विधायक काम करीत राहाणे हेच त्यांचे जीवितध्येय होते. स्वातंत्र्योत्तर काळात अशी माणसं फारच थोडी दिसतात. वाईसारख्या आडगावी राहून 'रा.ना.' साऱ्या महाराष्ट्रातील सामाजिक कार्यकर्त्यांशी एक जिवाभावाचे नाते ठेवून होते.

रा. ना. चव्हाण यांना सत्यशोधक विचारवंत असे यथार्थपणे म्हटले गेले आहे. महाराष्ट्रात जशी अग्रगण्य समाजप्रबोधकांची एक भव्योदात्त परंपरा दिसून येते तशी क्वचितच अन्य प्रांतात आढळेल. लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख, न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे, महात्मा जोतिराव फुले, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, राजर्षी शाहू महाराज, कर्मवीर भाऊराव पाटील अशी ही महान विचार-परंपरा आहे. हे केवळ विचारवंत नव्हते, आचारवंतही होते. यापैकी सत्यान्वेषी ज्ञानसाधक अन् समतोल चिंतक असणाऱ्या महर्षी शिंदे यांच्या जनमनजागृतीकार्याचा उदात्त वारसा कळकळीने पुढे चालविण्याचा वसा जसा रा.ना. चव्हाण यांनी उचलला तसा अन्य कोणी सामर्थ्याने उचलला असे दिसून येत नाही.



'रा.ना.' यांचे पूज्य पिताजी नारायण कृ. चव्हाण हे देखील ऋषितुल्य ब्रह्मोपासक. बहुजन समाजाच्या अभ्युदयासाठी त्यांनी अथक कार्य केले. त्यांचे सुसंस्कार रा. ना. चव्हाण यांच्यावर स्वाभाविकपणे घडले.

वयाच्या तेविसाव्या वर्षी (१९३६) प्रार्थना समाजाच्या सुबोधपत्रिकेत 'ब्राह्मसमाज व बहुजनसमाज' असा लेख लिहून 'रा.ना.' नी आपल्या वैचारिक लेखनाचा श्रीगणेशा केला. महर्षी शिंदे यांनी त्यांचे कौतुक केले आणि कळविले; 'बहुजन समाजाच्या बाजूने लिही. माझ्यापेक्षा चांगला लिहितोस.' पुढे अखेरपर्यंत 'रा.ना.' नी हे व्रतच आचरिले. त्यासाठी त्यांनी दुर्लभ साधने एकवटली. सत्यनिष्ठ संशोधक परंतु विनम्र अभ्यासक अशी भूमिका स्वीकारून त्यांनी ती साधने आपल्या सुलभ प्रासंगिक लेखातून सर्वांसमोर ठेवण्याचा प्रांजळ प्रयत्न केला.

आजच्या तरुण सुशिक्षितांत अंधश्रद्धा बळावत चालली असून धर्मांधताही वाढते आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर व्यक्तींची उन्नती काही प्रमाणात झाली पण सार्वजनिक मनोविकास मात्र झालेला नाही याची खंत 'रा.नां.' ना सतत अस्वस्थ करीत असे. आपल्या शांत स्वभावाप्रमाणे ते सौम्य शब्दात ही खंत नेहमी व्यक्त करीत.

'रा.ना.' ना लहानपणापासूनच विविध विषयांचे वाचन करण्याचा व टिपणे करून ठेवण्याचा नाद होता. १९२० ते १९२८ या काळात वाईतील सत्यशोधक चळवळीचे नेतृत्व त्यांच्या वडिलांकडे होते. त्यामुळे कुमारवयातच त्यांना सामाजिक प्रश्नांची जवळून ओळख घडू शकली. १९३३ पासूनच त्यांना महर्षी

विठ्ठल रामजी शिंदे यांच्यासारख्या ज्ञाननिधीचा उत्कट सहवास लाभला. १९४५ पासून पुढे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा सहवास मिळाला. पण तर्कतीर्थांच्या ज्ञानोपासनेशीच 'रा.ना.' संबद्ध राहिले. विश्वकोशकार्यातही त्यांनी महत्त्वाचा भाग घेतला. तर्कतीर्थांचे 'जोतिनिबंध' पुस्तक गाजले. या पुस्तकाची प्रस्तावना 'रा.ना.' यांची आहे. हे काम करण्यात तर्कतीर्थांना 'रा. नां.' ची बरीच मदत झाली. पुढे त्यांच्याशी काही वेळा मतभेद झाले. पण ते वैचारिक. त्यांतून व्यक्तिगत संबंधांत कटुता आली नाही.

महात्मा जोतिराव फुले, शाहूमहाराज, कृ. पां. भालेकर, डॉ. वि. दा. घोले, ना. मे. लोखंडे, रामय्या व्यंकय्या, अय्यावारू, मारोतराव नवले, भास्करराव जाधव, अण्णासाहेब लठ्ठे, कर्मवीर भाऊराव पाटील, प्रबोधनकार ठाकरे, केशवराव बागडे, दिनकर जवळकर, केशवराव जेधे अशी ब्राह्मणेतर कार्यकर्त्यांची एक मोठी मालिकाच महाराष्ट्राला सत्यशोधक चळवळीने दिली. त्यात एक अत्यंत प्रामाणिक, प्रसिद्धीपराङ्मुख, विनम्र अन् समंजस स्वभावाचे, तत्त्वनिष्ठ अन् ज्ञानसंपन्न कार्यकर्ते म्हणून रा. ना. चव्हाणांचे व्यक्तिमत्त्व विशेष उठून दिसते.

त्यांची मतेच वैशिष्ट्यपूर्ण होती. वानगीदेखील हे त्यांचे काही संतविषयक उद्‌गार पाहा : 'संत हे खऱ्या अर्थाने समाजसुधारक व धर्मसुधारक होते,' 'संतसाहित्य प्रसन्नता, गांभीर्य व शांतता निर्माण करून समाधान वाढविते,' 'संस्कारलोप झालेल्या आजच्या काळात संतांचे साहित्य व्यक्तीला व समाजाला प्रेरणा देण्यास आजही समर्थ असते. ज्या धर्मात संतांचा तुटवडा पडतो तो धर्म दृष्टीआड होऊ लागतो. महाराष्ट्रात असा तुटवडा पडला नाही व पडत नाही; हा इतिहासाचा अनुभव असल्यामुळे देखील महाराष्ट्र महान ठरतो,' 'राजेमहाराजे झाले, गेले पण संतांचे स्मरण व त्यांची काव्यसंपदा अमर आहे,' 'समाजात इष्ट काय व अनिष्ट काय याचा विवेक साधुसंतात आढळतो.' 'भारताचा पिंड आध्यात्मिक, धर्मपर व परमार्थप्रधान असल्यामुळे प्रथम धर्म सुधारला पाहिजे ही संतांची मनोधारणा होती.' 'संतांचे उपकार स्मरणे हे एक राष्ट्रीय कार्यच आहे.' 'रा.ना.' नी वेळोवेळी लिहिलेली ही वाक्ये अत्यंत बोलकी आहेत. खरेखुरे दलितमित्रच असा स्वच्छ विचार करू शकतात. संतसाहित्य हा आपल्या भारतीय सामाजिक/सांस्कृतिक इतिहासातील सर्वात जुना, दीर्घकाळापासून निरंतर प्रभावी राहिलेला आणि आजही सामान्यांच्या श्रद्धेचा गैरफायदा घेतात. हे 'रा. नां. ना ठाऊक नव्हते असे नाही. पण असे असले तरी मूळ संतसाहित्य, त्यातील आत्मज्ञान आणि आत्मभान महत्त्वाचे आहे, ते समाजाला तारकच ठरते याचा त्यांना विसर पडला नव्हता.

राजकारणाच्या बाबतीतही त्यांची विचारसरणी परखड होती. सामाजिक क्रांती लोकशाही चौकट स्वीकारून घडवायची असे ते म्हणत. आज महाराष्ट्रात जे विपरित चित्र दिसते, त्याबद्दलचे त्यांचे उदगार असे आहेत :

'सामाजिक क्रांती सोपी नाही. ती होऊ नये, असेही कोणास वाटत नाही. जो बदल व्हावयाचा आहे तो लोकशाहीतून, शिक्षणक्रमातून व पंचवार्षिक योजनेतून व्हावयाचा आहे. पण जरूर त्या परिवर्तनाला पूरक असा भाग विद्यमान शिक्षणात व योजनेतून दिसत नाही. म. फुले, शाहूमहाराज, महर्षी विठ्ठल शिंदे यांनी राजकारणाबरोबर मोठ्या प्रमाणात सामाजिक व धार्मिक परिवर्तनाचा विचार केला, तसा महाराष्ट्र सामाजिक परिषदेच्या द्वारे मराठा नेतृत्वाने केला नाही, तर त्यांच्या हातात गेलेली सत्ता केवळ निर्माल्यवत होती असाच काळ निर्वाळा देईल! मराठा विराट समाजाने विद्यमान राजकीय सत्तावादी/तथाकथित मराठा नेतृत्वावर अवलंबून राहू नये, कारण 'मराठा नेतृत्व' सत्तासंघर्षात गुंतत असते व त्याचा हा ऐतिहासिक दोष आहे. यादवकाळापासून किंबहुना



अनुक्रमणिका

त्याअगोदरपासून व पुढील मराठेशाहीत जे दोष चालत आले तसे आज आहेत. म्हणून महाराष्ट्र मागे आहे.'

आपल्या समाजाच्या स्थितीगतीचा अशा प्रकारे कठोर आत्मपरीक्षणपूर्वक विचार किती लोकनेते करू शकतात? सामान्यत: वेळीअवेळी धर्मविरोधी बोलून, साऱ्या सामाजिक समस्या केवळ धर्मनिष्ठांच्यामुळे अनिर्णित आहेत, अशी हाकाटी काही आंदोलकही करीत असतात. असा आततायी प्रकार 'रा.ना.' सारखे डोळस अभ्यासक करीत नसतात. धर्म आणि समाजसुधारणा याबाबत त्यांनी लिहिले आहे :

'धर्मांतरावर धर्मातीतपणा, धर्मबाह्यता, धर्मोल्लंघन वगैरे तत्सम मानवतावादी व्यापक उपाय समाजवादी, बुद्धिप्रामाण्यवादी व पुरोगामी म्हणविणाऱ्यांनी सुचविले आहेत. परंतु सर्वसाधारण व सर्वसामान्य जनता धर्मपराङ्मुख होणार नाही, व्यवहार्य उपाय सुचविणे म्हणूनच जरूर वाटते. देशातील दारिद्र्य नष्ट झाले तर दुर्बल घटकांचा ओढा धर्मांतराकडे धावणार नाही. समाजकल्याणात्मक कार्याची सर्वत्र वाढ होण्यासाठी 'समाजकल्याण' हे खाते मोठे झाले पाहिजे. त्याला फार मोठे बजेट प्राप्त झाले पाहिजे. समाज प्रबोधीनाची, परिवर्तनाची चळवळ प्रत्येक धर्मात चालू होणे जरूर आहे म्हणजे धर्मांधता नष्ट होईल. मुस्लिम सत्यशोधक मंडळ यशस्वी झाले पाहिजे. मूलत: मनुष्यमात्रांचा धर्म एकच आहे, हे शिक्षणातून सर्वांना शिकवावे. भारतीय तत्त्वज्ञान मूलत: सर्व मनुष्यांसाठी आहे. भारतीय धर्म मुळात विश्वधर्म आहे.'

डॉ. आ. ह. साळुंखे यांनी म्हटल्याप्रमाणे, 'शे-दीडशे वर्षांच्या सामाजिक इतिहासाचा प्रचंड तपशील 'रा.ना.' यांच्या मस्तकात एखाद्या संगणकाप्रमाणे नोंदवून ठेवण्यात आला होता. हा सारा तपशील वेळोवेळी त्यांनी लिहिलेल्या प्रासंगिक लेखांच्या माध्यमातून समाजासमोर सातत्याने येत राहिला. या लेखनात फारसा अभिनिवेश दिसत नाही. पांडित्याचे प्रदर्शन तर यत्किंचितही नाही. सर्वसामान्यांना सहज समजू शकेल, अशा सुगमसुबोध मराठीत त्यांनी जेव्हा जे मिळाले ते माध्यम स्वीकारून लिहिले.'

रा. ना. चव्हाणांचे बहुतेक सारे लेखन स्फुट, प्रासंगिक लेखांतून साकार झालेले आहे. ते सर्वसामान्य मराठी माणूस समोर ठेवूनच त्यांनी केलेले असल्याने छोट्या छोट्या, सुटसुटीत अन् सुबोध वाक्यांतून आपल्यापुढे येते. यात एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून महाराष्ट्रात जी समाजसुधारणेची चळवळ झाली तिचे पडसाद उमटले आहेत. न्या. रानडे, महात्मा जोतिराव फुले, लोकमान्य टिळक, शाहूमहाराज, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, कर्मवीर भाऊराव पाटील अशा अनेक क्रियाशूर, विचारवंत देशभक्तांच्या कार्यपद्धतीचा 'रा.ना.'नी अतिशय निष्ठापूर्वक मागोवा घेतला आहे. त्यावर विचारप्रदर्शन करताना समन्वयशील दृष्टिकोन तर ठेवला आहेच, पण नवे अभिनिवेश वाढू नयेत, जातीयवादी वृत्तींना खतपाणी मिळू नये अशी खबरदारीही घेतली आहे.

रा. ना. चव्हाणांच्या हयातीत त्यांचे लेख ग्रंथरूपात प्रकाशित होऊ शकले नाहीत. त्यांच्या विचारांची खरे तर दखलच कमी घेतली गेली याची कारणमीमांसादेखील करता येण्यासारखी आहे. थोडक्यात म्हणायचे तर रा. ना. चव्हाण यांचे विचारमंथन राजकारण्यांना सोयीस्कर वाटले नसावे. सामाजिक संस्था कार्यकर्त्यांनाही ते नव्या पिढीसमोर ठेवण्याचे सामर्थ्य मिळाले नसावे. आज त्यांचे सुपुत्र आणि त्यांच्या परिवारातील सदस्य 'रा.नां' चे लेखन चांगल्या स्वरूपात समाजासमोर ठेवीत आहेत. एकप्रकारे सामाजिक ऋणच फेडीत आहेत म्हणून त्यांचे अभिनंदन करावयास हवे.



**अशोक कामत**
पुणे.



अनुक्रमणिका

# निवडक नवे

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेसाठी आलेल्या ग्रंथांपैकी
निवडक ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर
(संबंधित पुस्तकांच्या प्रस्तावनेतील अभ्यासकांच्या उद्धरणांनी आणि लेखकांच्या भूमिकेने करून दिलेला हा परिचय.)

**दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची कविता**

रणधीर शिंदे यांच्या प्रस्तुत ग्रंथात साठोत्तरी पिढीतील अग्रगण्य कवी दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांच्या समग्र मराठी कवितेचे सर्व अंगांनी केलेले चिकित्सक विवेचन ग्रंथरूपाने प्रथमच पुढे येते आहे आणि त्याबद्दल नव्वदोत्तरी पिढीतील समीक्षक ग्रंथकार शिंदे यांचे अभिनंदन केले पाहिजे. चित्रे यांची कविता वाचकांना, रसिकांना, समीक्षकांना आणि साठोत्तरी व नव्वदोत्तरी कवींनाही आव्हान देणारी कविता आहे. तिच्यातील शब्दसौंदर्य, आशयसौंदर्य, रूपसौंदर्य यांनी सर्वच पिढ्यांतील साक्षेपी वाचक चकित झालेले आहेत; आणि होत राहातील. एखाद्या भाषेतील कविता त्या भाषेच्या भाषकांच्या संस्कृतीशी किती घनिष्ठपणे निगडित असते, त्याचवेळी तिने अन्य भाषकांच्या संस्कृतींचे संदर्भही आत्मसात केलेले असतात; हे मराठीत चित्रे यांच्या कवितेत ठळकपणे दिसते. मराठीतील संतकवितेपासून युरोपीय, अमेरिकन कवितेपर्यंत विश्वकवितेशी चित्रे यांच्या कवितेचा जैव अनुबंध आहे.

शिंदे यांनी प्रस्तुत ग्रंथात कवी आणि काव्यविषयक भूमिका, स्त्री-पुरुष मीलन संवेदनविश्व, महानगरीय संवेदन, कवीची विश्वात्मकता आणि स्थलांतरणे; आत्मविश्वभान आणि मिथकसृष्टी, काव्यभाषेतील सर्जकता आणि प्रतिमाविश्व या सहा प्रकरणांतून चित्रे यांच्या कवितेचा शोध आणि वेध घेतलेला आहे; आणि चित्रे यांच्या कवितेची मराठीतील अनन्यता स्पष्ट केली आहे. चित्रे यांच्या कवितेतील आशयसूत्रांविषयीचे आणि त्यांच्या कवितेच्या रूपबंधाविषयीचे शिंदे यांचे विवेचन मौलिक स्वरूपाचे आहे. विशेषत: आत्मविश्वभान आणि मिथकसृष्टी, आणि काव्यभाषेतील सर्जकता आणि प्रतिमाविश्व ही दोन प्रकरणे खूपच महत्त्वाची आहेत. कवितेला कवितापण देणाऱ्या या गोष्टींबद्दलचे शिंदे यांचे विवेचन वाचल्यावर समीक्षादेखील सर्जनशील लेखनाइतकीच वाचनीय आणि सौंदर्यप्रतीती देणारी असते हे जाणवते. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथ कवितेच्या अभ्यासकांनाच नव्हे तर सर्वसामान्य रसिकांनाही आनंद देणारा झाला आहे. 'ज्वालेचे फूल-शरच्चंद्र मुक्तिबोध : व्यक्ती आणि वाङ्मय' या ग्रंथानंतर येत असलेल्या प्रस्तुत ग्रंथामुळे शिंदे यांचे नव्या पिढीतील एक आश्वासक समीक्षक म्हणून स्थान निश्चित झाले आहे.



–वसंत आबाजी डहाके

**पुस्तक : दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची कविता**
*लेखक* : रणधीर शिंदे
*प्रकाशक* : दर्या प्रकाशन, पुणे ४६. (२०१३)
*पाने* : २३८, *किंमत* : २५० रु.



अनुक्रमणिका



## पराभूत धर्म

महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मयाचा लक्ष्मीबाई टिळक पुरस्कार (प्रौढ आत्मचरित्र – सन २०११-१२) मिळालेल्या 'होरपळ' या आत्मकथनानंतर 'पराभूत धर्म' ही कादंबरी लेखक रसिक वाचकांपुढे सादर करीत आहेत.

या कादंबरीत विश्व, ब्रह्म, शरीर, मन, आत्मा या अनुषंगाने सर्व धर्मांविषयी केलेले चिंतन आहे. धर्माचे तत्त्वज्ञान, आचरणपद्धती, प्रथा, परंपरा यांचे विवेचन करताना खऱ्या धर्मप्रयोजनाची साक्षेपी भूमिका मांडण्याचा प्रयत्न आहे.

वस्तुत: धर्म हा प्रेमाचा आविष्कार आहे. प्रेम हे मूलत: सर्वव्यापी असल्याने सर्व धर्मांतील प्रेमभाव इथे लेखकास अभिप्रेत आहे. धर्माकडे, वैश्विक सत्याचे अधिष्ठान म्हणून ते पाहातात. वैचारिक मतमतांतरे असणे स्वाभाविक आहे. तथापि, सकल मानवाचे कल्याण, बंधुत्व, सामंजस्य धर्मास अपेक्षित असूनही धर्माच्या नावे छळ, कलह, लढाई कशासाठी? असा त्यांचा सवाल आहे.

अनंत विश्वाचे रहस्य, अगम्य, अबोध ब्रह्मतत्त्वाचा शोध अविरत चालू आहे. याबद्दलची जिज्ञासा अखेर 'नेति नेति' म्हणून अनुत्तरित सोडणे लेखकास अप्रस्तुत वाटते. हे चिंतन कादंबरीच्या कलात्मक पातळीवर आविष्कृत झाले आहे, हे जाणवते. (लेखकाची जाणवते)

**पुस्तक : पराभूत धर्म (कादंबरी)**
*लेखक :* ल. सि. जाधव
*प्रकाशक :* सुविद्या प्रकाशन, सोलापूर (२०१३)
*पाने :* ३९२, *किंमत :* ३३० रु.

## प्रतिवाद ग्रंथ – काँग्रेसने आणि गांधीजींनी अखंड भारत का नाकारला?



शेषराव मोरे यांनी उपस्थित केलेले अस्वस्थ करणारे प्रश्न :

* देशाची फाळणी हिंदूंच्या फायद्याची झाली का?
* लीगने केलेल्या पाकिस्तान-ठरावाच्या वेळीच गांधींनी फाळणी मान्य केली होती का?
* बेचाळीसची चळवळ ही गांधींनी व काँग्रेसने उठवलेली हूल होती का?
* जिनांना पाकिस्तान नको होते; तर अखंड भारतात पन्नास टक्के सत्ता हवी होती का? आणि सर्वांत कळीची समस्या.
* हिंदू-मुसलमानांचे समान स्तरावरील सहजीवन शक्य आहे का?

या मूलगामी प्रश्नांची मान्यवर लेखकांनी केलेली सर्वांगीण व मार्मिक समीक्षा आणि शोधलेली खळबळजनक उत्तरे...

**सहभागी लेखक :** * आनंद हर्डीकर * प्रा. फकरुद्दीन बेन्नूर * डॉ. अलीम वकील * अब्दुल कादर मुकादम * श्री. मा. भावे * डॉ. के. रं. शिरवाडकर * विश्वास दांडेकर * डॉ. सदानंद मोरे * रमेश पतंगे * दिलीप करंबेळकर * डॉ. माधव गोडबोले * प्रदीप रावत

**पुस्तक : शेषराव मोरे यांच्या 'काँग्रेसने आणि गांधीजींनी अखंड भारत का नाकारला?' या ग्रंथाचा प्रतिवाद ग्रंथ**
*संपादक :* श्री. मा. भावे
*प्रकाशक :* राजहंस प्रकाशन, पुणे (२०१३)
*पाने :* ३६८, *किंमत :* ३५० रु.

### बळीचं जिणं

'हाती घेऊन गाडगं भटकतो रानीवनी । अवकृपा निसर्गाची नाही नाडग्यात पाणी ।। काळ्या ढेकळांच्या संगे त्याची खुले भाग्यरेषा । ऊन सावलीचा खेळ रोज जीवन-तमाशा ।।'

दयाराम गिलाणकरांच्या कवितेतील वरील ओळी वाचल्यानंतर शेतीमातीत राबता राबता आयुष्याचीच माती झालेल्या कित्येक पिढ्यांचं दु:ख काळजाला चटका लावून जातं. जिथे काळजाला चटका बसतो तो शब्द अस्सल असतो. गिलाणकारांच्या शब्दांचंही असंच आहे.



'बाप माझा शेतकरी राब-राबतो उन्हात । काळं हिरवं करून स्वप्न पेरतो मनात...'

शेतकऱ्याच्या जीवनात दु:ख हे एखाद्या इनामासारखं बांधून आलेलं असतं. उन्हातान्हात कष्ट करून वाट्याला दु:खाचीच रास येणार हे समजूनही तो उद्याचं स्वप्न पाहातो आणि रोज आतडी पिळवटली तरी कधीतरी देव कष्टाला पावेल ह्या भरवशावर आशेची पेरणी करत राहातो. शेतकरी आणि शेतकऱ्याची सुखदु:खे कवीला श्वासाइतकीच जवळ आहेत.

'उभं आयुष्य जाळत
ऊरी अंगार झेलते
माय बनते सावली
बाग लेकाची फुलते...'

आईने दिलेला ओवीचा शब्द त्यांच्या मुठीत आहे म्हणून 'बाईची गाणी' लिहिता लिहिता ते 'कुणब्याची कहाणी' सांगू लागतात.

कवी दयाराम गिलाणकर 'बळीचं जिणं' ह्या पहिल्याच काव्यसंग्रहाच्या रूपाने 'शब्दांची लेणी' उभी करण्यात यशस्वी झाले आहेत.

– प्रकाश होळकर (प्रस्तावनेतून)

**पुस्तक : बळीचं जिणं (काव्य)**
*लेखक :* दयाराम गिलाणकर
*प्रकाशक :* शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर (२०१३)
*पाने :* ८०, *किंमत :* १०० रु.

### धुक्यात हरवेलला पैंजण

माधवी वैद्य यांनी प्रेमभावनेतील सुख-दु:खाविषयींची समंजस स्वीकारशीलता, नात्याच्या संपलेपणातील अटळ अपरिहार्यता, विद्धता, जे मिळालं त्याविषयीची अपार कृतार्थता, आणि मुख्य म्हणजे एवढे होऊनही प्रेमभावनेवरील अढळ विश्वास, सकारात्मकता यांचे जे एक प्रगल्भ दर्शन या कवितांमधून घडवले आहे त्यामुळे त्यांच्या या कविता एका उंचीवर पोहोचल्या आहेत.



ही कविता केवळ शारीर प्रेमाची नाही. शारीरतेला ओलांडून प्रीतीच्या एका मोठ्या, पवित्र, काहीशा आध्यात्मिक आभाळात, मानसपूजेच्या विशाल पातळीवर ही कविता जाऊन थांबली आहे.

– अंजली कुलकर्णी (प्रस्तावनेतून)

**पुस्तक : धुक्यात हरवलेला पैंजण (काव्य)**
*लेखक :* माधवी वैद्य
*प्रकाशक :* सुरेश एजन्सी, पुणे (२०१४)
*पाने :* १०४, *किंमत :* १२० रु.

### भोत

श्रावण्याचं डोकं छातीशी धरून पुंडलिकाने जवळची वही उघडली. त्याने कविता वाचायला सुरुवात केली, ''जिता-जागता जलम मिळाला पण




वळू म्हणून उपाशी मारलं... अन् मेल्यावर मातूर.. कातडं सोलून, भुस्सा भरून पुन्हा भोत म्हणून जन्माला घातलं.. जगण्यासाठी सगळेच धडपडतात पण, शेवटी मेल्यावरही त्यांच्या निर्जीव-उघड्या डोळ्यांत एक भोत असतो कायम.. जो सोताही फसलेला असतो अन् आईलाही फसवून गवळ्यांचा स्वार्थ पुरवीत असतो. पण, आत्ता गायींनी, आईंनी हुशार व्हायला पायजी... कारण, तीबी जिवंत असून एक भोतच. तुमच्यासारख्या मुड्द्यांनी तर, तिला जिवंतपणीच फसवलं आहे... प्रेमानं चाटण्यासाठी विवश केलं आहे. वासरासाठी तिचं राखीव असणारं दूधही तुम्ही पळवून डेरीत नेलं.... सावधान... उद्या माणसांच्या माद्यांनीही दूध द्यायचं नाकारलं तर, तुमचेही जिवंतपणी कातडे उतरवून, माझ्यासारखे भोत करून टाकतील!''

(लेखकाच्या निवेदनातून)

**पुस्तक : भोत**

*लेखक :* महेश निकम

*प्रकाशक :* अक्षरलेणं प्रकाशन, सोलापूर (२०१३)

*पाने :* ४४२, *किंमत :* ३०० रु.

### निवडलेले खर्डे

गेली पुष्कळ वर्षे मंगशे विठ्ठल राजाध्यक्ष हे नाव मराठी वाचकांच्या डोळ्यांसमोर अधूनमधून आहे. या नावाने स्वत:वर किती टोपणे चढवली हा संशोधनाचा विषय ठरेल. त्यातले 'निषाद' हे 'अभिरुचि' मासिकातील सदरासाठी घेतलेले टोपण सर्वात गाजलेले. अशी टोपणनावे यथावकाश फोडून, त्यांखाली केलेले लेखन पुन्हा प्रकाशित करण्याचा उत्साह राजाध्यक्षांनी मुळीच दाखवला नाही. हेच त्यांनी खऱ्या नावाने केलेल्या लेखनाविषयीही म्हणता येईल. आधी सातत्याने लिहिणे या गोष्टीवर विश्वास नाही, आणि नंतर जे काही लिहिले ते पुस्तकरूपाने वाचकांसमोर ठेवण्याची निकड नाही.

राजाध्यक्षांनी जे लिहिले ते स्वत:च्या तब्येतीने. मग तो विनोदी लेख असो, टीकालेख असो, व्यक्तिचित्र असो की स्थलचित्र असो. तीच संवेदनशीलता, तीच पूर्णतावादी वृत्ती. या वृत्तीमुळे जे आवडले ते प्रगल्भ विश्लेषक बुद्धीने उकलून दाखवले, जे आवडले नाही त्याची खट्याळपणे चेष्टा केली. खऱ्याला उत्स्फूर्त प्रतिसाद दिला आणि खोट्यावर प्रहार केला. दोन्ही प्रतिक्रियांमागे तीच अभिजात रसिकता होती. '५ कवि' या संपादनात या रसिकतेने तिचा उत्कर्षबिंदू गाठला.




या रसिकतेचे पोषण इंग्रजी वाङ्मयाच्या अभ्यासामुळे अधिक कसदारपणे झाले. राजाध्यक्षांची घट्ट बांधणीची खास शैली हे त्यांना या अभ्यासातून मिळालेले दुसरे देणे. इंग्रजी भाषेच्या वळणातील अनेक बारकावे, स्वत:चे मराठीपण न गमावता या शैलीने सामावून घेतले आहेत.

मं.वि. राजाध्यक्ष यांच्या १९४६ ते २००३ पर्यंतच्या लेखनप्रवासातील एकूण तेरा पुस्तकांमधून हे काही 'निवडलेले खर्डे' आहेत. त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त प्रकाशित झाले.

– श्री पु. भागवत

(मलपृष्ठ प्रस्तावनेतून)

**पुस्तक : निवडलेले खर्डे**

*लेखक :* मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष

*प्रकाशक :* मौज प्रकाश गृह, मुंबई ४ (२०१३)

*पाने :* ३५२, *किंमत :* ४०० रु.



अनुक्रमणिका

**रिंगणाबाहेरून**



रिंगणात उतरून चार डाव खेळल्याशिवाय शिरपेच मिरवायची अपेक्षा बाळगता येत नाही. पण त्यामुळेच रिंगणाबाहेर पडणंही कठीण होऊन बसतं. उलट, रिंगणाबाहेर स्वैर संचार करण्यातील मजा काही औरच असते.

ग्रंथव्यवसायात पूर्णपणे गुरफटूनही लेखकाला अशी मौज घेता आली; याचा प्रत्यय 'रिंगणाबाहेरून' मधील प्रत्येक प्रकरणात येतो. राजकारण, रंगभूमी आणि संगती ह्या प्रत्येक क्षेत्रात संचार करायला जन्म पुरत नाही. पण रिंगणाबाहेरून मारलेला हा फेरफटका लेखकाबरोबरच वाचकालाही सुखद ठरावा.

रामदास भटकळ यांनी 'जिगसॉ : स्टडी इन फ्रेंडशिप'मध्ये त्यांच्या स्वत:च्या ज्येष्ठ मित्रांसोबतच्या स्नेहभावाचा आलेख काढला. 'मोहनमाया'मधे गांधी आणि त्यांचा मित्रपरिवार यांच्या नात्यावर मनोरंजकपणे लिहिलं. 'जगदंबा' ह्या नाटकात कस्तुरबांच्या दृष्टिकोनातून बापूंची कथा सांगितली. 'रिंगणाबाहेरून'मध्ये त्यांनी आपल्या स्वत:च्या अनुभवप्रवासाचं केलेलं अनोखं वर्णन वाचायला मिळेल.

**पुस्तक : रिंगणाबाहेरून**
*लेखक :* रामदास भटकळ
*प्रकाशक :* मौज प्रकाश गृह, मुंबई ४ (२०१३)
*पाने :* १५६, *किंमत :* १७० रु.

**सिनेमा पहावा काढून**



डॉ. दिलीप सरवटे हे उद्योजक, व्यवस्थापक सल्लागार व व्यवस्थापन शिक्षक या तिहेरी भूमिकेत पुण्याहून कार्य करीत आहेत. माहिती तंत्रज्ञान, मायक्रोफिशिंग, प्रकाशन, जाहिरात संस्था, निर्यात अशा विविध क्षेत्रांत त्यांनी आपले उद्योग सुरू केले. ते सर्टिफाईड मॅनेजमेंट कन्सल्टंट (सी एम सी) असून, जून १९७२ पासून या व्यवसायात आहेत. १९९०-२००१ मध्ये ते इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट कन्सल्टंटस् ऑफ इंडिया (आय.एम.सी.आय.) चे राष्ट्रीय अध्यक्ष होते. आत्तापर्यंत त्यांनी भारतात व भारताबाहेर ८०० च्या वर प्रकल्पांवर काम केले आहे. गेली ४० वर्षे ते मार्केटिंग, स्ट्रॅटेजी, उद्योजकता विकास व इतर अनेक विषयांतील प्रसिद्ध वक्ते आहेत. एम.बी.ए. शिकविणाऱ्या अनेक शिक्षणसंस्थांशी त्यांची बांधीलकी आहे. त्याचबरोबर भारतातील अनेक मोठ्या उद्योगांसाठी त्यांनी प्रशिक्षण कार्यक्रम घेतले आहेत.

'उद्योजक बना', 'सहयोजक बना', 'ज्ञानयोजक बना', 'ग्राहक राजा जागा हो', 'आजारी उद्योग-समस्या व उपाय', उत्कृष्टतेच्या शोधात- काही भारतीय अनुभव', 'निवडणुका जिंकण्यासाठी सर्व काही' अशी एकाहून एक सरस पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. त्याचबरोबर व्यवस्थापन क्षेत्रातील विविध विषयांवर इंग्रजीत १४ पुस्तके लिहिली आहेत. यातील 'पॉलीटिकल मार्केटिंग' हे १९८९ मध्ये प्रकाशित झालेले, जगातील ह्या विषयावरील पहिले पुस्तक होते.

'मणी-मंगळसूत्र' या मराठी चित्रपटाचे ते निर्माते आहेत. या अनुभवाच्या आधारावरूनच त्यांनी 'सिनेमा पहावा काढून!' हे पुस्तक लिहिले आहे. त्यांचे विचार ते परखडपणे मांडतात. व्यवस्थापन विषयावर इंग्रजीत व मराठीतून सातत्याने इतके विपुल लिखाण करणारे ते एकमेव लेखक असतील. त्यांच्या लिखाणात

'सिद्धांत' व 'प्रात्यक्षिके' यांचा योग्य समावेश दिसून येतो. मुख्य म्हणजे, त्यांची सर्व उदाहरणे भारतीय मातीची असतात. या प्रवर्तक कामांचे मूल्य त्यामुळे अधिक आहे.

डॉ. दिलीप सरवटे मुंबई विद्यापीठाचे इलेक्ट्रिकल इंजिनियर असून, त्यांनी अमेरिकेतून एम.बी.ए.ची पदवी मिळवली. त्यानंतर पुणे विद्यापीठातून व्यवस्थापन शास्त्रातील डॉक्टरेट मिळविली.

ते पीएच.डी.चे गाईड असून, २५ विद्यार्थ्यांनी त्यांच्या मार्गदर्शनाखाली डॉक्टरेट मिळविली आहे.

**पुस्तक : सिनेमा पहावा काढून**
*लेखक :* डॉ. दिलीप सरवटे
*प्रकाशक :* प्रेरणा प्रकाशन, पुणे ३० (२०१२)
*पाने :* १५६, *किंमत :* १५० रु.

**आयुष्यमान भव (अधिक उपायांसह-समग्र)**



माणूस किती जगला, यापेक्षा कसा जगला याचे अधिक महत्त्व आहे. जीवनाच्या वाटेवर अनेक आघात पचवण्याची ताकद लागते. शरीर निरोगी असेल, तर हे आघात झेलताना त्याचा चिलखताप्रमाणे उपयोग होतो.

आरोग्य अबाधित राहण्यासाठी निसर्गातच अनेक गोष्टी आपल्याभोवती आहेत. आपल्याच सभोवताली असलेली अल्पमोली व बहुगुणी औषधांची निसर्गाने मानवजातीवर उदारहस्ते केलेली आहे.

आपले व आपल्या कुटुंबीयांचे आरोग्य जपण्यासाठी 'आयुष्यमान भव (अधिक उपायांसह-समग्र)' हे पुस्तक एक छोटासा प्रयत्न आहे. आजच्या Instant जमान्यात सर्वसामान्य आजारांवर वेळेचा व कामांचा खोळंबा न होता त्यापासून त्वरित आराम मिळावा ही सर्वसामान्यांची रास्त अपेक्षा असते. त्या दृष्टीने प्रत्येक व्यक्तीला किमान घराघरांत व त्वरित उपलब्ध असणारी औषधे माहीत असणे आवश्यक व तितकेच महत्त्वाचे असते. त्यासाठी प्रत्येक घरात 'आयुष्यमान भव' हे पुस्तक संग्रही असणे आवश्यक आहे.

Stitch in time, Saves nine या दृष्टिकोनातून या पुस्तकाचे लेखन/संकलन केले गेले आहे. या पुस्तकात सर्वसामान्य रोगांवर निसर्गोपचार दिलेले आहेत. वनस्पती व त्यांचे औषधी उपयोगही दिले आहेत. त्याचवेळेस सर्वसामान्य रोग व त्यावर घरगुती अनेक उपाय एकाच ठिकाणी लेखकाने दिल्याने वाचकाला ते उपयोगी ठरते.

आजच्या रासायनिक युगात ॲलोपथीची औषधे न घेता आपण निसर्गोपचार घेण्यास उत्सुक असल्यास तुम्हांला हे पुस्तक खचितच मार्गदर्शक ठरणार आहे. पुस्तकाची लेखकाने केलेली मांडणी पण औषधे शोधायला खूपच सोपी, सहज पडते.

उत्तम छपाई, पुस्तकाची सुंदर निर्मिती या पुस्तकाचे सौंदर्य मूल्य वाढविण्यास मदत करते हे नक्की. असे पुस्तक काढल्याबद्दल ले. संजय कुंडेटकर, प्रकाशक - तेजल प्रकाशन व पुस्तकनिर्मिती शुभ क्रिएशन्स यांचे अभिनंदन.

**पुस्तक : आयुष्यमान भव**
*लेखक :* डॉ. संजय कुंडेटकर
*प्रकाशक :* तेजल प्रकाशन, पुणे ३० (२०१४)
*पुस्तकनिर्मिती :* शुभ क्रिएशन
*पाने :* २२४, *किंमत :* २८० रु.



## मुद्रण सौंदर्यात मोलाची भर घालणारे - 'कल्पक' लाटकर

– ह. ल. निपुणगे


जन्म : २४ फेब्रुवारी १९२८
मृत्यू : ७ जानेवारी २०१४

जवळजवळ १९७० पर्यंत पुण्यात असलेले सर्व छापखाने-मुद्रणालये मोनो-अखंड टाईपाचा वापर करीत असत.

कै. चि. स. लाटकर यांनी पुण्यात निर्णयसागरचा डिग्री टाईप आणून एकंदरच मुद्रणसौंदर्यात मोलाची भर घातली.

त्यावेळी मुख्यत: मुंबईला मौज, निर्णयसागर, कर्नाटक या ख्यातनाम मुद्रणालयांत डिग्री टाईपाचा उपयोग करून सुबक छपाई केली जात असे. त्यामुळे उत्कृष्ट आणि दर्जेदार छपाईसाठी ग्राहकाला मुंबईला धाव घ्यावी लागत असे.

अण्णासाहेब लाटकर यांनी ही उणीव भरून काढली. पुण्यातील सर्व नामांकित प्रकाशक – रा.ज.देशमुख– देशमुख आणि कंपनी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, व्हीनस प्रकाशन, मॅजेस्टिक यांसारख्या प्रकाशन संस्था आपले पुस्तक कल्पना मुद्रणालयात छापले जावे. यासाठी धडपड करीत असत. अनेक स्मरणिका, संदर्भ ग्रंथही कल्पनाकडे छापले जात असत.

नामवंत लेखक– रणजित देसाई, वि.स.खांडेकर, पु.ल.देशपांडे हेही आपली पुस्तकं 'कल्पना' मध्ये छापली जावीत, असा आग्रह आपल्या प्रकाशकाकडे धरीत असत.

अण्णासाहेब स्वत: छपाईच्या सर्व कामांकडे लक्ष देत असत. ललित पुस्तकाची एकूण सुबक, दर्जेदार, देखणी मांडणी ते स्वत: लक्ष घालून करीत असत. मांडणीचे विविध प्रकारही ते हाताळीत असत. 'कल्पना'मध्ये छापलेल्या प्रत्येक पुस्तकामध्ये वेगळेपण असेच असे.

एखादा फॉर्म मशिनवर छापायला जाताना तो त्यांच्या नजरेखालून गेलाच पाहिजे असा त्यांचा कटाक्ष असे. 'फ्रंट-बॅक' ते स्वत: पाहात. ओळीवर ओळी बरोबर आल्यात की नाही, 'पेज हेडिंग' बरोबर आले की नाही, फॉर्मची घडी घालून ते स्वत: पाहात असत. या सर्व त्यांनी घेतलेल्या कष्टांमुळे 'कल्पना' मुद्रणालयात छापलेले पुस्तक देखणेच असे. मुद्रित-शोधन (प्रूफ करेक्शन)कडेही ते जातीने लक्ष देत असत. त्यामुळे सर्व बाजूंनी देखणी अशी पुस्तकांची निर्मिती होत असे. लेखकाने प्रूफे तपासून 'छापावं' अशी सूचना दिल्यावरही अण्णासाहेबांच्या नजरेला एखादी चूक येत असे. ती ते दुरुस्त करून घेत असत. त्या वेळी हाताने कंपोझ करून पुस्तके छापली जात असत; आणि म्हणूनच फार बारकाईने पुस्तकांची छपाई करावी लागत असे.

अण्णासाहेब लाटकर स्वत: सर्व कामाकडे लक्ष देत असल्याने, अगदी बाईंडिंग होईपर्यंतच्या कामाकडे त्यांचे लक्ष असल्याने 'कल्पना' मधून निर्माण झालेले पुस्तक देखणेच असे.

'कल्पना'मध्ये छापल्या गेलेल्या अनेक पुस्तकांना, स्मरणिकांना राष्ट्रीय स्तरावर अनेक पारितोषिके, मान-सन्मान मिळाले आहेत.

आंध्रप्रदेश साहित्य संघ, हैद्राबादचे त्रैमासिक– 'पंचधारा'– त्याचे संपादक द. पं. जोशी कित्येक वर्षे मुद्दाम पुण्याच्या कल्पना मुद्रणालयातून छापून घेत असत. अनेक साहित्य संमेलनांच्या स्मरणिका



अनुक्रमणिका

पुण्याला कल्पना मुद्रणालयात मुद्दाम छापायला येत असत. 'मुद्रकाने मुद्रक राहावे म्हणजे त्याचे काम सुंदर होईल. प्रकाशक होऊ नये कारण मुद्रणकलेत तडजोड येता कामा नये.' असे ते म्हणत.

कै. अण्णासाहेब लाटकर यांच्यासारखा कल्पक मुद्रक आता पुन्हा होईल का?

त्यांना मन:पूर्वक श्रद्धांजली.

**ह.ल. निपुणगे,**
३८१अ/१, शनिवार पेठ, पुणे : ४११०३०
फोन : (०२०) २४४८३०६२
मो. ९८२३५४६०४२

## पत्रकार, संपादक, साहित्य आणि सांस्कृतिक कार्यकर्ते - द्वारकानाथ लेले

– दीपक करंदीकर



जन्म : २१ जुलै १९३२
मृत्यू : १८ जानेवारी २०१४

पुण्याच्या दैनिक सकाळचे त्या वेळचे संपादक असलेले कविताप्रेमी पत्रकार द्वारकानाथ लेले यांनी पुण्यातले त्या काळातले आघाडीचे कवी कल्याण इनामदार यांना आपल्याबरोबर घेऊन दिनांक १८ नोव्हेंबर, १९७२ रोजी पुण्याच्याच भारत इतिहास संशोधक मंडळाच्या राजवाडे सभागृहात राजकवी 'यशवंत' यांच्या प्रमुख उपस्थितीत 'काव्यशिल्प' पुणे ही कवी आणि रसिकांची संस्था स्थापन केली.

तेव्हापासून आज २०१४ च्या जानेवारी महिन्यापर्यंत 'काव्यशिल्प'ची दरमहा होणारी काव्यमैफल गेले ४१ वर्षे अव्याहतपणे चालू आहे. आज बेचाळिसाव्या वर्षानंतर सुद्धा या रोपट्याला कवी/कवयित्रींची टवटवीत फुले दोन पिढ्यांच्या अंतराने डौलाने डोलताना दिसतात.

या मागे एका सजग, दूरदृष्टीधारक, सव्यसाची पत्रकार-रसिकाची पेरणी महत्त्वाची ठरते. द्वारकानाथ लेले यांनी स्थापनेपासूनच काव्यशिल्पला साधे साधे नियम घालून दिले; आणि एखाद्या सांस्कृतिक / साहित्यिक संस्थेची सुखरूप, अविरत वाटचाल कशी व्हावी, याचा वस्तुपाठच जणू घालून दिला.

१९९६ साली कविवर्य मंगेश पाडगावकर यांच्या उपस्थितीत काव्यशिल्पचा रौप्यमहोत्सव उत्साहाने पार पाडला. तोपर्यंत शांताबाई शेळके, सुरेश भट यांच्यापासून ते गंगाधर महाम्बरे, अरुणा ढेरे यांच्यापर्यंत आणि प्रा.स.शि.भावे यांच्यापासून ते डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्यापर्यंत साहित्यक्षेत्रातील जवळजवळ सर्व मान्यवरांनी 'काव्यशिल्प' संस्थेला भेट देऊन संस्थेचे कार्य, 'काव्यशिल्पा'तून तयार झालेल्या नवोदित कवी-कवयित्रींचे काव्य ऐकून त्यांचे कौतुक केले आहे.

आसावरी काकडे, मनोहर सोनवणे, दीपक करंदीकर, प्रदीप निफाडकर, जयंत भिडे, डॉ. संगीता बर्वे, अंजली कुलकर्णी, उद्धव कानडे, सतीश इनामदार, प्रकाश पाठारे, घनश्याम धेंडे, बंडा जोशी, मीरा शिंदे, प्रभा सोनवणे, कविता क्षीरसागर-कुलकर्णी ही महाराष्ट्रभर गाजत असलेली काही निवडक कवींच्या नावांची चटकन आठवणारी मांदियाळी! जी 'काव्यशिल्प'मधून तयार झाली.

कवींची अभिरूप न्यायसभा, काव्यविषयक चर्चा, मतमतांतरे, सभासदांच्या गीतांचे कार्यक्रम, बाहेरच्या संस्थांनी निमंत्रण दिल्यावरून सादर केलेली कविसंमेलने, परस्परांच्या कवितांवरची भाष्ये अशा प्रकारचे असंख्य कार्यक्रम 'काव्यशिल्प'मध्ये सातत्याने चालू असतात. आज पुणे शहर आणि परिसरातील कोणताही कवी काव्यशिल्पच्या पटावर सभासद म्हणून असतो– ही काव्यशिल्पला अभिमानास्पद गोष्ट आहे.

पुणे सकाळ-'स्वराज्य'चे संपादकपद सांभाळल्यावर तेथून ते नाशिक सकाळचे संपादक होऊन निवृत्त झाले. 'सानेगुरुजी कथामाला' या संस्थेच्या माध्यमातून त्यांनी गेली ५०-६० वर्षे मुलांवर संस्कार करणाऱ्या



अनुक्रमणिका

शेकडो कथाकथनांचे कार्यक्रम केले. त्या प्रकारची पुस्तके लिहिली. ‘सुराज्यशक्ती’सारखे नियतकालिक सुरू करून माझ्यासारख्यांना वेगवेगळ्या विषयांवर लिहायला उद्युक्त केले. ‘सदाचार भारती’ या पुण्यातील सामाजिक क्षेत्रात काम करणाऱ्या संस्थेचे ते अनेक वर्षे आधारस्तंभ राहिले. स्वत:ला भारत बघण्याची हौस असल्याने त्यांनी अशा प्रकारच्या असंख्य सहली स्वत: आयोजित करून पार पाडल्या. शिवाय लहान मुलांना जादूचे प्रयोग शिकविण्याचे वर्गसुद्धा अनेक वर्षे मे महिन्यात त्यांनी घेतले.

डिसेंबर २०१३ च्या काव्यमैफलीत अंधश्रद्धेवर टीका करणारी स्वत: रचलेली पहिलीवहिली कविता अगदी स्पष्टपणे वयाच्या ८२व्या वर्षीसुद्धा त्यांनी म्हणून दाखविली. ती अखेरचीच ठरली! १७ जानेवारी २०१४ त्यांनी इहलोक सोडला.

**दीपक करंदीकर**
१०४४/४/२, ‘दर्शन’, सदाशिव पेठ,
रहाळकर राम मंदिरासमोर, पुणे : ४११०३०
मो. ९४२३००७०३५

## अनुवादक, प्रकाशक, पत्रकार इ.इ. - अशोक जैन



बंगाली भाषेचे जाणकार, अनियतकालिक चळवळीचे प्रणेते, ‘प्रास’ प्रकाशनचे संस्थापक, वितरक, मुद्रणकलेचे जाणकार, स्तंभलेखक इ. अनेक पैलू असलेले अशोक जैन यांचे ८०व्या वर्षात निधन झाले. अनेक क्षेत्रांना पोरकेपण आले. वाढलेली दाढी, विखुरलेले केस, जाड चष्मा, भेदक नजर, जाडाभरडा आवाज, कृश शरीरयष्टी आणि या सर्वांवर मात करणारे दिलखुलास बोलणे; असे त्यांचे असणे होते. प्रारंभी ‘सत्यकथे’साठी अनुवादित बंगाली कथा त्यांनी लिहिल्या. ‘प्रास’ प्रकाशनतर्फे अरुण कोलटकरांच्या इंग्रजीतील ‘जेजुरी’ प्रकाशित केली. दिलीप चित्रे यांचे ‘दहा बाय दहा’, सतीश काळसेकरांचे ‘साक्षात’, नामदेव ढसाळांचे ‘खेळ’, भालचंद्र नेमाडेंचे ‘मेलडी’ ही महत्त्वाची प्रकाशने होत. बंगाली लोकप्रिय लेखकांच्या कादंबऱ्याही त्यांनी मराठीत आणल्या. त्यापैकी शंकर यांची – ‘जनअरण्य’ आणि गौरकिशोरांची ‘इसम’ ह्या मराठी वाचकांना खूप भावल्या. शंभूमित्र, तस्लिमा नसरीन इ. लेखकांचे साहित्यही मराठीत आणले. अशोक जैन यांच्या बंगाली भाषेवरील प्रभुत्वाचा उपयोग पु.ल. देशपांडे, दुर्गा भागवत यांनाही वेळोवेळी झाला. पु.लं.ना टागोरांवरील चरित्र लिहिताना उपयोग झाल्याचा उल्लेख आहे. ‘अथर्व’ नावाचे अनियतकालिक सुरू करून ते पहिल्याच अंकानंतर थांबले. महाराष्ट्र टाइम्समधील ‘कानोकानी’ सदरातील लेखनाने ते लोकप्रिय झाले. पंतप्रधान नरसिंहराव यांच्या ‘आऊटसायडर’चा अनुवाद ‘बहि:स्थ’ ह्या नावाने त्यांनी केली. जुळारी-खिळाऱ्यापासून त्यांनी मुद्रणकला आत्मसात केली आणि त्यात प्राविण्य मिळविले. अशोक जैन ह्यांना म.सा.प. तर्फे श्रद्धांजली!

### संकटकाळी धावून आलेले अशोक जैन

डेक्कनक्वीन पकडण्यासाठी घाईघाईने निघालो. रस्ता ओलांडून स्टेशनच्या बाजूच्या फूटपाथवर आलो. गाडी सुटायला पाच-सात मिनिटं उरली होती. म्हणून अधिकच घाई करीत होतो.

तेवढ्यात माझा पाय फूटपाथवर फेकण्यात आलेल्या केळ्याच्या सालीवर पडला आणि तो सटकला. मी दाणदिशी फूटपाथवर पडलो. जोरात लागलं होतं. तरी मी तसाच उठून चालायचा प्रयत्न करू लागलो. पण मला उठता येईना. उभं राहाता येईना. त्यातच मला चक्कर आली. मी फूटपाथवरच आडवा होऊन पडलो.

आठ-दहा मिनिटं गेली असावी. मला शुद्ध आली. भोवती गर्दी जमली होती. गाडी तर चुकलीच होती. मी उठायचा प्रयत्न केला. पण जमेना.

आपला पायबीय मोडला असणार हे लक्षात आलं. आता काय बरं करावं? कोणाला मदतीसाठी हाक मारावी? काही क्षण विचार केला आणि खिशातलं

व्हिजिटिंग कार्ड काढलं, गर्दीतल्या एका माणसासमोर धरून त्याला म्हणालो, "साहेब, मला प्लीज मदत करा. ते बघा. समोरच टाइम्स ऑफ इंडियाच्याच इमारतीत 'महाराष्ट्र टाइम्स' वर्तमानपत्राचं ऑफीस आहे.. तिथं संपादकीय विभागात जा. तिथं कोणाही माणसाला हे कार्ड द्या आणि सांगा की व्हिजिटिंग कार्डवाला माणूस पाय घसरून इथं फूटपाथवर पडला आहे. त्याला उठता येत नाहीये. कोणाला तरी मदतीला बोलावलंय,"

सर्वांत आधी धावत आले अशोक जैन. दोनतीन मिनिटांतच तिथं पोहोचले दि. वि. गोखले आणि चंद्रकांत ताम्हाणे.

एकंदर परिस्थिती त्यांच्या लक्षात आली. त्यांनी मला शेजारच्या हॉस्पिटलमध्ये हलवलं आणि मुकुंदरावांना कळवलं. त्यांनी पुढली व्यवस्था केली.

दुसऱ्याची थट्टामस्करी (अर्थात, निर्मळ) करण्याचा अशोक जैनांचा स्वभावच होता. त्यांच्या 'कानोकानी' या म.टा. मधल्या लोकप्रिय सदरात त्यांनी एकदोनदा मलाही चिमटे काढले होते. पण ते वाचावे, हसावं आणि विसरून जावं, अशाच स्वरूपाचे होते.

म.टा. मधलं 'कानोकानी' हे सदर त्यांनी सुरू केलं ते म.टा.चे दिल्ली प्रतिनिधी ही जबाबदारी संपवून ते म. टा. च्या मुख्य कार्यालयात वरिष्ठ संपादक म्हणून परत आल्यावर.

जैन म.टा.चे दिल्ली प्रतिनिधी म्हणून बरीच वर्षे काम करीत होते. त्यावेळी त्यांनी लिहिलेली 'दिल्ली वार्तापत्रे' ही मराठी वृत्तपत्रीय लेखनाला मोठी देणगी आहे. ही त्यांची वार्तापत्रं रसाळ, खुसखुशीत आणि ललित शैलीत असत. 'दिल्ली वार्तापत्रे' सर्वच वर्तमानपत्रांत असतात. पण जैन यांनी त्या वार्तापत्रांची शैलीच बदलून टाकली हे त्यांचं मराठी पत्रकारितेला मोठंच योगदान होय!

थट्टेखोर पण उमदा स्वभाव असलेले जैन हे मराठीतले एक महत्त्वाचे पत्रकार गणले गेले. अशा माणसाला अर्धांगवायूने अंथरुणाला खिळवून ठेवावं आणि त्यातच त्यांचा मृत्यू व्हावा ही मात्र माणसाला न समजणारी दैवगती!

**ह. मो. मराठे**
मो. नं. : ९४२३०१३८९२

## कादंबरीकार, कथाकार, अनुवादक आणि म.सा.प.चे कार्यकर्ते - रंगा मराठे

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ग्रंथालय-कार्यवाह रंगा मराठे यांचे ७ जानेवारी २०१४ रोजी दु:खद निधन झाले; त्या वेळी ते ९१ वर्षांचे होते. इ.स. १९९२ ते २००६ पर्यंत म्हणजे १४ वर्षे त्यांनी म.सा.प.चे कार्यवाह म्हणून ग्रंथालय विभाग सांभाळला. व्यवसायाने ते ऑडिटर होते. 'रस्टन' कं.मध्ये ते अंतर्गत लेखातपासनीस होते. एक उमदे-आनंदी व्यक्तिमत्त्व म्हणून ते सुपरिचित होते. उद्योजगांच्या जगात ते वावरत होते. त्यामुळे कामगार-व्यवस्थापन क्षेत्रांशी ते खूप निगडीत होते. 'फॅक्टरी-गेट' ही त्यांची कादंबरी खूप गाजली. १९७० ते १९९० ही वर्षे अनेक उलथापालथीची गेली. बँकांचे राष्ट्रीयीकरण, बांगलादेश युद्ध, हजार व अधिक किमतीच्या नोटा चलनातून रद्द, आणीबाणीतले जनता पक्षाचे राज्य इ. घटनांच्या पार्श्वभूमीवर ही कादंबरी लक्षणीय झाली. 'कार्पोरेट विश्वातील' वातावरणावर आधारित 'महामार्ग' ही कादंबरी तसेच महात्मा गांधीजींच्या शिष्या मीराबेन यांच्या आत्मवृत्ताचा संक्षिप्त अनुवाद 'एक चैतन्य यात्रा', ओसा जॉन्सनचे आत्मवृत्त 'नरभक्षकाच्या जबड्यात'चा अनुवाद हे 'संक्षिप्त' अनुवाद. कथेच्या प्रांतात दोन कथासंग्रह लक्षणीय ठरले. 'लाल चिंचेचे झाड' आणि 'मन पंछी बावरा'.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह म्हणून ग्रंथालय विभाग सांभाळताना ग्रंथांची सूची आणि त्याचे व्यवस्थापन लावून दिले. एक रंगकर्मी म्हणूनही त्यांचा परिचय करून देता येईल. वि. वा. शिरवाडकरांच्या 'दूरचे दिवे' आणि विश्राम बेडेकरांच्या 'वाजे पाऊल आपुले...' मधील भूमिका विशेष गाजल्या.

एक निष्ठावान कार्यकर्ता म्हणून त्यांची सर्वांना ओळख होती. त्यांचा मित्रपरिवारही मोठा होता. त्यांच्या निधनाने सच्चा मित्र हरपल्याचे दु:ख होत आहे. म.सा.प. तर्फे त्यांना श्रद्धांजली!



# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त

(दि. १ डिसेंबर २०१३ ते २८ फेब्रुवारी २०१४)

## — पुणे शहर —

**१) दि. १३ डिसेंबर २०१३ : नवं कोरं :** डॉ. अनिल गांधी यांच्या 'मनाचा शोध' या कथासंग्रहावर चर्चात्मक कार्यक्रम आयोजित केला होता. उन्मेष प्रकाशन संस्थेच्या मेधा राजहंस यांनी सूत्रसंचालन केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. विश्वास देवकर, डॉ. संजय वाटवे, आनंद यादव यांनी चर्चेत भाग घेतला. लेखक डॉ. अनिल गांधी यांनी पुस्तकाच्या लेखनामागची भूमिका विशद केली. डॉ. संजय वाटवे यांनी मानसशास्त्रीय दृष्टिकोनातून लेखनाचा विचार सांगितला. अध्यक्षीय समारोप डॉ. आनंद यादव यांनी केला.

**२) दि. २३ ते २५ डिसेंबर २०१३ :** मासिक मनोरंजनकार का. र. मित्र व्याख्यानमाला यंदा २३ ते २५ डिसेंबर असे तीन दिवस 'साहित्य संमेलन' या मध्यवर्ती संकल्पनेवर आधारित व्याख्यानमाला दरवर्षीप्रमाणे आयोजित करण्यात आली.

**अ) दि. २३ डिसेंबर २०१३ :** 'अ. भा. मराठी साहित्य संमेलने : इतिहास व परंपरा' या विषयावर अभ्यासपूर्व असे भाषण वक्त्या डॉ. मेधा सिधये यांनी देऊन व्याख्यानमालेचे पहिले पुष्प गुंफले. डॉ. मेधा सिधये यांचा परिचय व कार्यक्रमात अनुपस्थितांचे स्वागत, प्रास्ताविक व आभारप्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले. डॉ. न.म. जोशी यांच्या हस्ते डॉ. मेधा सिधये यांचा सत्कार करण्यात आला.

**ब) दि. २४ डिसेंबर २०१३ :** 'मी पाहिलेली साहित्यसंमेलने' या विषयावर मूलभूत निरीक्षणे मांडणारे डॉ. न. म. जोशी यांनी व्याख्यान देऊन व्याख्यानमालेचे दुसरे पुष्प गुंफले. स्वागत, प्रास्ताविक, आभारप्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले. आजचे वक्ते यांचा सत्कार व परिचय कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी करून दिला.

**क) दि. २५ डिसेंबर २०१३ : 'का. र. मित्र व्याख्यानमालेचे तिसरे पुष्प व थोर साहित्यिक श्री. म. माटे स्मृतिदिनाचे औचित्य साधून 'बालकुमार साहित्य संमेलने :** काळाची गरज' या विषयावर माधुरी गोखले यांनी आपले विचार प्रकट केले. शैक्षणिक क्षेत्रात काम करत असल्याने श्रोत्यांमध्ये त्यांचे विद्यार्थी या कार्यक्रमास उपस्थित होते. बालकुमार साहित्य संस्थेची प्रेरणा व संस्थापक सदस्य व ज्येष्ठ बालसाहित्यकार दत्ता टोळ यांच्या हस्ते आजच्या वक्त्यांचा सत्कार करण्यात आला. स्वागत व प्रास्ताविक कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी माधुरी गोखले यांचा परिचय करून दिला व आभार मानले. तीनही दिवसांच्या व्याख्यानमालेला श्रोत्यांचा प्रतिसाद चांगला होता.

**३) दि. १९ जानेवारी २०१४ : कॉफी क्लब :** अमेरिकेतील शिकागो येथे स्थायिक झालेल्या व ८० च्या दशकात अमेरिकेतील पहिले महाराष्ट्र मंडळ स्थापन करण्यात पुढाकार घेतलेल्या जयश्री हुपरीकर यांच्याशी गप्पांचा कार्यक्रम झाला. यावेळी म. ना. गोगटे, श्री. हुपरीकर, डॉ. माधवी वैद्य व प्रकाश पायगुडे उपस्थित होते. उपस्थितांनी कॉफीपानाचा आस्वाद घेतला.

**४) दि. १८ जानेवारी २०१४ : पर्यावरणस्नेही साहित्य संमेलन :** महाराष्ट्र साहित्य परिषद, महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी व पगमार्क यांच्या संयुक्त विद्यमाने दोन दिवसांचे पर्यावरणस्नेही साहित्य संमेलन गरवारे कॉलेजच्या सभागृहात आयोजित करण्यात आले होते. संमेलनाचे उद्‌घाटक डॉ. रामचंद्र देखणे व अध्यक्ष मंगेश तेंडूलकर होते. संतसाहित्यात दिसणाऱ्या संतांच्या पर्यावरणविषयक जागरूक अशा लेखनाचे दाखले देत डॉ. देखणे यांनी आपले विचार प्रकट केले. श्री. तेंडूलकरांनी मानवी हस्तक्षेपामुळे होत असलेल्या पर्यावरण हानीचा उल्लेख अध्यक्षीय भाषणात केला. 'पर्यावरणरक्षणाची स्त्री मानसिकता' या विषयावर विद्या बाळ यांचे भाषण झाले. त्यानंतर या संमेलनानिमित्ताने घेण्यात आलेल्या पर्यावरणविषयक निबंध व कविता स्पर्धेत यशस्वी झालेल्या विद्यार्थ्यांचे/शिक्षकांचे निबंधवाचन व कवितावाचन झाले. यानंतर 'कवितेतील वनस्पती' या विषयावर डॉ. मंदार दातार व डॉ. मेहश शिंदीकर यांनी तयार केलला 'दृकश्राव्य' कार्यक्रम उपस्थितांसमोर सादर करण्यात आला. 'शिवछत्रपतींची पर्यावरणनीती' या विषयावर निनाद बेडेकर यांचे व्याख्यान झाले. नंतर डॉ. अनिल अवचट यांच्या अध्यक्षीय समारोपाच्या भाषणाने पहिल्या दिवसाचे सर्व कार्यक्रम गाजले. दुसऱ्या दिवशीच्या दिवसभराच्या कार्यक्रमाचे उद्‌घाटन डॉ. मधुकर बाचुळकर यांच्या हस्ते झाले. 'पश्चिम घाट व पर्यावरण' या विषयावर त्यांनी आपले विचार प्रकट केले. डॉ. अपर्णा वाटवे यांचे 'जैवविविधता पश्चिम घाट पठाराची' या विषयावर भाषण झाले. यानंतर काही महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचा 'दृक-श्राव्य' सादरीकरणाचा कार्यक्रम झाला. डॉ. राजेंद्र केरकर यांचे ''जैविक संपदा आणि संस्कृती'' या विषयावर भाषण झाले. आरती कुलकर्णी दिग्दर्शित 'नातं पश्चिमघाटाशी' या विषयावरचा लघुपट दाखविण्यात आला. अध्यक्षीय समारोप डॉ. माधव गाडगीळ यांच्या भाषणाने झाला. परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, कोषाध्यक्ष सुनील महाजन, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कार्यवाह नंदा सुर्वे, डॉ. कल्याणी दिवेकर, सुनीता राजे पवार, दीपक करंदीकर इत्यादींनी दोन दिवसांच्या ह्या संमेलनात उपस्थित राहून प्रतिनिधित्व केले.

**५) दि. २० जानेवारी २०१४ : कॉन्टिनेण्टल प्रकाशन पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक वितरण समारंभ :** यंदाचा हा पुरस्कार ज्येष्ठ व्यंगचित्रकार मंगेश तेंडूलकर यांच्या 'संडेमूड' या पुस्तकाला व स्नेहल प्रकाशनाच्या रवींद्र घाटपांडे यांना ज्येष्ठ व्यंगचित्रकार शि.द. फडणीस यांच्या हस्ते देण्यात आला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन, स्वागत, प्रास्ताविक. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले. श्रा. सुजाता शेणई यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. सौ. माधुरी वैद्य या परीक्षक म्हणून उपस्थित होत्या. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले व प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. यावेळी चिं. वि. जोशी यांच्या कन्या सौ. अलका मांडके उपस्थित होत्या.

**६) दि. २२ जानेवारी २०१४ : नवं कोरं :** प्रसिद्ध चित्रकार लेखक व प्रकाशक श्री. ल. म. कडू यांनी लिहिलेल्या 'खारीच्या वाटा' या कादंबरीवर चर्चात्मक कार्यक्रम झाला. या कादंबरीचा परिचय डॉ. मेधा सिधये यांनी करून दिला. ल. म. कडूंची मुलाखत वंदना बोकील-कुलकर्णी यांनी घेतली. योगेश सोमण यांनी या कादंबरीतील काही प्रसंगांचे प्रभावी वाचन केले. मान्यवरांचे स्वागत प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. मान्यवरांचे स्वागत प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. कार्याध्यक्ष माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन करून आभार मानले.

**७) दि. ३ फेब्रुवारी २०१४ : श्रद्धांजली सभा :** नामदेव ढसाळ, द्वारकानाथ लेले, दाजीकाका

गाडगीळ, रंगा मराठे, चिं. स. लाटकर, सुधाकर डोईफोडे, सर्जेराव घोरपडे या सर्वांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी सभा झाली. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य अध्यक्षस्थानी होत्या. प्रारंभी उद्धव कानडे यांनी नामदेव ढसाळ यांच्या काही कवितांचे वाचन केले. आनंद लाटकर, प्रा. रामनाथ चव्हाण, डॉ. कल्याणी देवकर, डॉ. न. म. जोशी, प्रकाश घोडके, दीपक करंदीकर, ह. ल. निपुणगे, विलास वाघ या वक्त्यांनी आपल्या श्रद्धांजलीपर भावना व्यक्त केल्या. डॉ. माधवी वैद्य यांनी अध्यक्षीय समारोप केल्यावर उपस्थितांनी मृतांना दोन मिनिटे उभे राहून श्रद्धांजली अर्पण केली.

**८) दि. ४ फेब्रुवारी २०१४ : मातापितामह स्मृतिव्याख्यान :** प्रा. ग. वा. करंदीकर यांचे 'लोकमान्य टिळक व गीता रहस्य' या विषयावर व्याख्यान झाले. हे व्याख्यान म.सा.प. व डॉ. मेधा सिधये परिवार यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात आले होते. गीतेचा प्रवृत्तिवाद टिळकांनी कसा सांगितला आहे. हे करंदीकरांनी त्यांच्या व्याख्यानात विषद केले. प्रास्ताविक डॉ. मेधा सिधये यांनी केले व प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी आभार मानले. यावेळी व्यासपीठावर कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य उपस्थित होत्या.

**९) दि. ७ फेब्रुवारी २०१४ : कै. माधवराव मदाने स्मृति व्याख्यान :** श्री. विद्याधर अनास्कर यांचे 'सहकाराचे अर्थशास्त्र' या विषयावर व्याख्यान झाले. सहकारी संस्थांचा उगम, त्यासंबंधीचे कायदे इत्यादी माहिती त्यांनी दिली व व्याख्यानानंतर उपस्थित श्रोत्यांच्या शंकांचे यथोचित समाधान केले. स्वागत व प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. त्यानंतर डॉ. वि. वि. घाणेकर यांनी कै. माधवराव मदाने यांच्या काही आठवणी सांगितल्या. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन, आभारप्रदर्शन व मुख्य वक्त्यांचा परिचय कार्यवाह दीपक करंदीकर यांनी करून दिला.

**१०) दि. १२ फेब्रुवारी २०१४ : पद्मश्री सन्मान विजेते डॉ. गणेश देवी सत्कार :** महाराष्ट्र साहित्य परिषद व महाराष्ट्र प्रकाशक परिषद, पुणे यांचे संयुक्त विद्यमाने बडोदा येथील भारतीय भाषा-तज्ज्ञ व पद्मश्री डॉ. गणेश देवी यांचा सत्कार मा. डॉ. शां. ब. मुजुमदार यांच्या हस्ते करण्यात आला. मराठी प्रकाशक परिषद अध्यक्ष रमेश कुंदूर यांचे हस्ते मान्यवरांचे स्वागत करण्यात आले. कोषाध्यक्ष अरविंद पाटकर यांनी प्रास्ताविक केले. म.सा.प. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य व म. प्र. प. कार्याध्यक्ष अरुण जाखडे यांनी आपली भूमिका मांडली. डॉ. सौ. सुरेखा गणेश देवी यांचा सत्कार मसाप कार्यवाह सुनीता राजे पवार यांच्या हस्ते केला गेला. डॉ. गणेश देवी यांना देण्यात येणाऱ्या मानपत्राचे वाचन करण्यात आले. इतर अनेक संस्था व व्यक्ती यांच्या हस्ते डॉ. देवी यांचा सत्कार करण्यात आला. डॉ. प्रा. प्रसन्न देशमुख, विनय हार्डीकर, डॉ. निलिमा गुंडी यांची डॉ. देवी यांच्या गौरवपर भाषणे झाली. डॉ. मुजुमदार यांनी अध्यक्षीय समारोप केला. महाराष्ट्र प्रकाशक परिषदेचे उपाध्यक्ष अनिल कुलकर्णी यांनी आभार मानले. त्या अगोदर डॉ. गणेशदेवी यांनी सत्काराला उत्तर देणारे विचार प्रकट केले.

**११) दि. १९ फेब्रुवारी २०१४ : कॉफीक्लब :** कन्नड भाषिक लेखिका वैदेही यांची मुलाखत उमा कुलकर्णी यांनी घेतली. मिळून साऱ्याजणी, साहित्यप्रेमी भगिनी मंडळ व म.सा. परिषद या संस्थांच्या संयुक्त विद्यमाने हा कार्यक्रम आयोजित केला होता. सूत्रसंचालन मीरा शिंदे यांनी केले. उमा कुलकर्णी यांनी 'वैदेही' यांची "आम्मीची आठवण" ही अनुवादित कथा सादर केली. विद्या बाळ, ज्योत्स्ना आफळे व डॉ. माधवी वैद्य व्यासपीठावर उपस्थित होते. वैदेहींच्या साहित्यामधून कानडी स्त्रीजीवनाचे चित्रण आढळते. डॉ. माधवी वैद्य यांनी आभार मानले.



अनुक्रमणिका

**१२) दि. २० फेब्रुवारी २०१४ : सुहासिनी इर्लेकर स्मृति पुरस्कार समारंभ :** नवोदित कवी पृथ्वीराज तौर यांच्या 'गाव आणि शहराच्या मधोमध' या प्रथमप्रकाशित कवितासंग्रहास डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या हस्ते पारितोषिक दिले गेले. कै. सुहासिनी इर्लेकर यांच्या कन्या डॉ. दीपा क्षीरसागर आणि बीडच्या नगराध्यक्षा यांनी मनोगत व्यक्त केले व इर्लेकर यांची एक कविता पेश केली. इर्लेकरांचे पती यशवंत इर्लेकर, डॉ. अश्विनी धोंगडे, परीक्षक अंजली कुलकर्णी, मृणालिनी कानिटकर जोशी यांचा सुनील महाजन व प्रकाश पायगुडे यांच्या हस्ते सत्कार करण्यात आले. परीक्षकांनी आपल्या भूमिका स्पष्ट केल्या. डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या हस्ते पृथ्वीराज तौर यांना पारितोषिक वितरण करण्यात आले. श्री. तौर यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. अश्विनी धोंगडे यांनी अध्यक्षीय समारोप केला. सूत्रसंचालन कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले व आभार कार्यवाह नंदा सुर्वे यांनी मानले.

**१३) दि. २१ फेब्रुवारी २०१४ : कै. रा. श्री. जोग समीक्षाग्रंथ पुरस्कार वितरण :** प्रा. डॉ. सु. रा. चुनेकर यांच्या हस्ते रणधीर शिंदे यांच्या 'दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची कविता' या समीक्षाग्रंथास देण्यास आले. सूत्रसंचालन व प्रास्ताविक डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले. विजय बालघरे यांच्या दर्या प्रकाशन संस्थेस या ग्रंथाचे निर्मितीबद्दल पुरस्कृत करण्यात आले. परीक्षकांच्या वतीने डॉ. निलिमा गुंडी यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. मेधा सिधये परीक्षक म्हणून उपस्थित होत्या. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले. प्रा. डॉ. सु. रा. चुनेकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. त्याआगोदर रणधीर शिंदे व प्रकाशक यांनी मनोगते व्यक्त केली.

**१४) दि. २४ फेब्रुवारी २०१४ : म. श्री. दीक्षित व अशोक जैन यांना श्रद्धाजली सभा :** डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या अध्यक्षतेखाली आणि कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या उपस्थितीत श्रद्धांजली सभा झाली. स्वाती कर्वे, सुनील महाजन, ह. मो. मराठे, सु. वा. जोशी, अरुण खोरे, अविनाश भोमे, प्रकाश होळकर, डॉ. कल्याणी दिवेकर, दीपक करंदीकर, डॉ. माधवी वैद्य, प्रा. डॉ. प्रज्ञा दीक्षित व अध्यक्ष डॉ. प्र.चिं. शेजवलकर या वक्त्यांची श्रद्धांजली भावना व्यक्त करणारी भाषणे झाली.

**१५) दि. २६ फेब्रुवारी २०१४ : स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर स्मृतिदिन व्याख्यान :** प्रा. वैजयंती चिपळूणकर यांचे 'सावरकरांचा भाषाशुद्धी विचार : मराठी संदर्भात' या विषयावर व्याख्यान झाले. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी स्वागत केले. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला. प्रास्ताविक, सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले. प्रारंभी विक्रम सावरकर व कृषिकोशकार अशोक महादेवशास्त्री जोशी यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**१६) दि. २८ फेब्रुवारी २०१४ : राष्ट्रीय विज्ञान दिन :** मराठी विज्ञान परिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद या संस्थांच्या संयुक्त विद्यमाने मा. डॉ. बाळ फोंडके यांचे 'वैज्ञानिक दृष्टिकोन' या विषयावर व्याख्यान झाले. व्याख्यानाच्या शेवटी उपस्थित श्रोत्यांनी विचारलेल्या प्रश्नांना समर्पक उत्तरे देऊन फोंडके यांनी श्रोत्यांशी संवाद साधला. विनय र.र. व कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत, प्रास्ताविक केले. नीता शहा यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.



**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.



अनुक्रमणिका

## – म.सा.प. ठाणे जिल्हा शाखा –

**१) २३ जून २०१३ :** शाखेच्या ३४ व्या वर्धापन दिनानिमित्त डॉ. अनंत देशमुख यांचे 'माझे चरित्रात्मक लेखन' या विषयावर व्याख्यान झाले.

**२) दि. २८ सप्टेंबर २०१३ :** 'प्रा. म.वि. फाटक स्मृतिपुष्प' : डॉ. प्रतिभा आठवले यांचे 'रमणीय पूर्वांचल' या विषयावर व्याख्यान झाले.

**३) दि. १७ नोव्हेंबर २०१३ :** 'कवितांगण' हा कविता/गझलांसाठीचा खास कार्यक्रम दिवसभरासाठी आयोजित केला होता. गझल : स्वरूप आणि तंत्र व मुक्तछंद : स्वरूप आणि तंत्र या विषयांवर दोन परिसंवाद झाले. त्यात अनुक्रमे चंद्रशेखर सानेकर, ए.के. शेख, सदानंद डबीर, दिलीप पांढरपट्टे व डॉ. वसंत पाटणकर, प्रा. अशोक बागवे, डॉ. नीलिमा गुंडी यांचा सहभाग होता. यावेळी गझलगायनसुद्धा झाले.

**४) दि. ३ डिसेंबर २०१३ :** ८७ व्या अ.भा.म. साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष कविवर्य फ.मु. शिंदे यांचा मराठी ग्रंथसंग्रहालयाद्वारा सत्कार करण्यात आला.

## – म.सा.प. इस्लामपूर शाखा –

**१) दि. १ डिसेंबरला २०१३ : एकविसावे मराठी साहित्य संमेलन :** राजन खान हे संमेलनाध्यक्ष होते. शहानवाज मुल्ला. हे स्वागताध्यक्ष होते. प्रा. राजा माळगी हे उद्घाटक होते. 'माझा गांव' – सर्जेराव कचरे व आनंद हांडे यांच्या बालसाहित्यावरील दहा पुस्तकांचे प्रकाशन झाले. सूत्रसंचालन रवि बावडेकर यांनी केले. संजय आबटे (कुंडल) व रवि राजमाने (येळवी) यांचे कथाकथन झाले. अध्यक्ष प्रा. दीपकस्वामी यांच्या उपस्थितीत झालेल्या कविसंमेलनात निलम माणगावे, रमजान मुल्ला, नंदिनी साळुंखे-पाटील, प्रा. प्रदीप पाटील, डॉ. सुरज चौगुले, वैजयंती पेठकर, स्वाती शिंदे-पवार, रघुराज मेटकारी, अंध कवी देशमुखे, निलांबरी शिर्के यांनी काव्यवाचन केले.

**२) दि. १० डिसेंबर २०१३ : आचार्य जावडेकर स्मृतिदिन :** प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांचे व्याख्यान झाले. गौतम पाटील अध्यक्ष होते.

**३) दि. २ नोव्हेंबर २०१३ :** 'सूर पहाटेचे' – हा हिंदी-मराठी गीतांचा कार्यक्रम ज्ञानेश्वरी पाटील व सहकलाकारांनी सादर केला. निवेदक धर्मवीर पाटील होते.

**४) दि. २१ जानेवारी २०१४ : कवी नामदेव ढसाळ यांना श्रद्धांजली सभा :** प्रा. शामराव पाटील, प्रा. राजा माळगी, प्रा. डॉ. दीपा देशपांडे, प्रा. वि. द. कदम, प्रा. एकनाथ पाटील, भगवानराव मोटे, डी.आर.सलगर, प्रा. आर.बी. शिंदे यांनी श्रद्धांजलीपर भावना व्यक्त केल्या.

**५) दि. १५ फेब्रुवारी २०१४ :** प्रा. एस.के. कुलकर्णी यांच्या 'सात दशक-पाचसुटे' या पुस्तकाचे प्रकाशन भानू काळे यांचे हस्ते झाले. प्रा. डॉ. एन्. पाटील अध्यक्षस्थानी होते. स्वागत व प्रास्ताविक प्रा. डॉ. दीपा देशपांडे व सूत्रसंचालन वृषाली आफळे यांनी केले.

## – म.सा.प. शाखा शिराळा –

**१) दि. १६ जाने. २०१४ : कवी नामदेव ढसाळ यांना श्रद्धांजली सभा :** एस्.एम्. पाटील, प्रा. कुंभार, आर.बी. शिंदे, डी.एन्. मिरजकर, डॉ. दुकळे, प्रा. हिरेमठ, प्रा. सुमन पाटील, प्रा. नीता जोखे, बाबा परीट, सुभाष नलावडे, दिनेश हसबनीस यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली.

**२) दि. २२ जानेवारी २०१४ :** डॉ. वा.ना. उत्पात यांचे प्रवचन लोकनेते कै. फत्तेसिंगराव नाईक (आप्पा) यांच्या स्मृतिदिनानिमित्त आयोजित करण्यात आले होते. एस.एम्. पाटील यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. 'संत नामदेवांचे पसायदान' या विषयावर प्रवचन झाले. प्रा. गावडे यांनी आभार मानले.



अनुक्रमणिका

## – म.सा.प. जुळे सोलापूर शाखा –

१) दि. ८ फेब्रुवारी २०१४ : **राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा २०१३ :** प्रा. ए.डी. यांचे अध्यक्षतेखाली, मा. आमदार प्रणिती शिंदे यांच्या हस्ते, सोलापूर मनपा आयुक्त यांचे प्रमुख उपस्थितीत पारितोषिक वितरण पार पडले.

प्रथम पुरस्कार : साहित्य आभा, अलिबाग
द्वितीय पुरस्कार : दै. संचार, सोलापूर
तृतीय पुरस्कार : रणधैय, श्रीपूर
विशेष पुरस्कार : हास्यनगरी, सोलापूर व छात्रप्रबोधन, पुणे

कार्यक्रमाचे प्रास्ताविक अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते यांनी केले. सूत्रसंचालन प्रशांत जोशी व आभार कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी केले. सायली जोशी यांनी दिवाळी अंकांचे परीक्षण केले.

२) नामदेव ढसाळ यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. याचवेळी सोलापूर शहरातील दिवंगतांनाही श्रद्धांजली वाहण्यात आली.

३) दि. २७/२/२०१४ : **मराठी भाषा दिन :** कुसुमाग्रज यांच्या आठवणी जागविण्यात आल्या. याचवेळी ज्येष्ठ साहित्यिक म. श्री. दीक्षित यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

(विशेष दुरुस्ती नोंद : म.सा. पत्रिका अंक क्र. ३४६ पान क्र. ६१ मथळ्यास "जुलै" ऐवजी "धुळे" हा शब्द छापला गेला आहे. तो 'जुळे सोलापूर' असा वाचावा.)



**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.













# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचे

## २२ वे विभागीय साहित्य संमेलन, सातारा

### दि. २२,२३,२४ नोव्हेंबर २०१३



२२ वे विभागीय साहित्य संमेलन, साताराचे संमेलनाध्यक्ष नारायण कुलकर्णी कवठेकरांसमवेत
य प्रज्ज्वलन करतांना डावीकडून- श्री. प्रवीण पाटील, विनोद कुलकर्णी, प्रकाश पायगुडे, रवीन्द्र बेडकीहाळ,
सुनिल महाजन, कवी प्रा. फ.मु. शिंदे (सपत्नीक),
डॉ. माधवी वैद्य, आमदार श्रीमंत छत्रपती शिवेन्द्रसिंहराजे भोसले, स्वागताध्यक्ष श्री. अमोल मोहिते

अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : January - March 2014
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*



प्रेषक




**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.



₹2.00

ठा. ४३. गुप्ते मेघना सदाशिव
५ औंदुबर प्रासाद,
सिद्धेश्वर आळी, पारनाका,
मु.पो.ता. कल्याण
(जि.ठाणे)

अनुक्रमणिका